# नाणेफेक

## ( दोन अंकी नाटक )

-- चं..प्र.देशपांडे

## अंक पहिला

| | |
|---|---|
| रवींद्र | वय २८, इन्शुअरन्स कंपनीत कारकून. |
| वनिता | वय २५, इन्कमटॅक्स ऑफिसात कारकून. रवींद्रची पत्नी. |
| योगिनी | वय २१, स्पार्क इंजिनिअर्समध्ये कारकून. रवींद्रची बहीण. |
| नयना | वय २५, नोकरी नाही. समाजकार्य. |

पडदा उघडतो तेव्हा रवींद्रचा फ्लॅट दिसतो. हॉल, दोन बेडरूम्स व किचन असा हा फ्लॅट आहे. समोर अर्थात हॉल दिसतो. मध्यमवर्गीय फर्निचर, फोन वगैरे. संध्याकाळची वेळ. समोर कुणी नाही. काही क्षणांनी बेल वाजते. आतून वनिता येते. ती नुकतीच वॉश घेऊन आलेली. हातात टावेल असतो. जाऊन दार उघडते. योगिनी आत येऊन दार लावते. चेहऱ्यावर उत्साह.

योगिनीः ( वनिता आत जात असताना तिला थांबवत -- ) थांब, थांब, बस इथे.

वनिताः अग हो, हो, कपाळावर टिकली तरी लावून येते नं !

योगिनीः डोंट वरी -- (स्वतःच्या पर्समधून टिकली काढते. ) हं, ही घे ! बस इथे !

वनिताः हे असं काय एवढं ? ( तिच्याकडून टिकली घेऊन लावते, बसते.) इतकं काय आहे अगदी --

योगिनीः तसंच आहे ! तुला लगेच सांगायला हवंय असं !

वनिताः काय कुठं प्रेम बिम जमवलंयस का काय ?

योगिनीः प्रेम बिम नाही पण तत्सम !

वनिताः तत्सम ?

योगिनीः प्रेम करणं, त्याच्यात वाहून जाणं, अमुक एका व्यक्तीशिवाय जगणं अशक्य होणं असला भावनिकपणा माझ्या स्वभावात नाही हे तुला माहीत आहे. मी तशी म्हटलं तर थोडी रुक्षच आहे.

वनिताः रुक्ष बिक्ष काही नाहीयस तू. छान आहेस तू !

योगिनीः पण रुक्ष म्हणजे वाईट असं धरून बोलतच नाहीय मी. तो फक्त एक स्वभावचा प्रकार आहे इतकंच ! छान आहेच मी तशी !

वनिताः हं, मग ठीक आहे.

योगिनीः म्हणजे ?

वनिताः काही नाही. सांग तू. उगीच ताणून धरू नकोस.

योगिनीः तर तुझ्या माहितीप्रमाणे - लग्न करायचं नाही -असा माझा निर्णय होता - अं ? ( वनिता बघतेय ) तर आता तो बदललेला आहे. तग्न करायचं -- असं मी ठरवलं आहे !

वनिताः ( आनंदून )वा !हे तर छानच ! हेच शहाणपण तुला सुचावं, यासाठी काय कराव तेच कळत नव्हतं मला ! पण म्हणजे कसं काय बदललं सगळं ? हा चांगला टर्न कसा काय मिळाला विचाराला ?

योगिनीः चांगला टर्न की काय ते नाही माहीत ; पण टर्न मिळालाय हे खरं !

वनिताः माझ्या मते चांगलाच आहे. सांग तू.

योगिनीः मी जे सांगतेय ते तुला प्रचंड आवडणारं आहे. म्हणून तर धरून बसवलंय तुला. तू खूष होशील हे माहीतच होतं मला.

वनिताः हं, सांग, सांग.

योगिनीः खरं तर मी लग्न न करण्याचा जो माझा निर्णय होता तो तरी कुठं तुम्हाला कारणांसह सांगितला होता ? नाही करायचं मला लग्न एवढंच सांगितलं होतं.

वनिताः हजारदा विचारलं तरी उपयोग काय झाला ?

योगिनीः तसंच आता माझा निर्णय बदलला आहे म्हणजे पहिल्याच्या विरुध्द झाला आहे-- एवढं सांगितलं

तरी पुरे की !

वनिताः सांगायचं नसलं तर नको सांगूस ! पण आता तुला शहाणपण सुचलंय हेच आनंदाचं आहे !

योगिनीः तसं नाही. सांगत का नव्हते ? आता सांगायला हरकत नाही. कारण तुमच्या कळपात यायचं ठरवलंय मी. आणि निर्णय बदलला कसा हे सांगण्यापूर्वी तो झाला होता कसा हे सांगायला नको ?

वनिताः अगं, सांग ना मग !

योगिनीः आधी सांगत नव्हते काण माझे विचार तुझ्या न् रवीच्या चाललेल्या संसाराच्या स्मूथनेसला टोकरणारे ठरले असते. आता मी सांगणार आहे कारण आता मी तुमच्यात येऊन बोलणार आहे ; आता टोकरल्यासारखं होणार नाही.

वनिताः अती विचार बाई तुझा !

योगिनीः भावना कमी म्हटल्यावर विचार जरा जास्त येणारच !

वनिताः आता माझ्या उत्सुकतेचं काय करू मी ? पहिल्यांदा या उत्सुकतेतून मला मुक्त कर आणि मग सांग सगळं सविस्तर.

योगिनीः एकाच वेळी होणार दोन्ही. तर मी 'नाही' का म्हणत होते ते आधी सांगते. मी स्वभावतःच स्वतःला एखाद्या व्यक्तीत गुंतवून घेणारी नाही. या स्वभावामुळंच लग्न करावं की करू नये हा प्रश्न माझ्या मनात आला. हा स्वभाव नसता तर यातनं निवड करायचं माझ्या डोक्यात आलंच नसतं बहुतेक. लग्न करायचं म्हटलं तर - शिक्षण, उंची, दिसणं, जाती-उपजाती, वय, घरची परिस्थिती, नोकरीधंदा, वागण्याच्या पध्दती, पुढच्या प्रगतीच्या शक्यता - या सगळ्या गोष्टींचा गोंधळ आला. यातलं सगळंच्या सगळं आपल्या अपेक्षेप्रमाणे असणं शक्यच नाही. म्हणजे कुठले तरी पॉईंटस् आपण सोडून द्यायला तयार होणार. त्यातलाच एखादा पॉईंट पुढं फार महत्त्वाचा ठरू शकेल हे माहीत असून ! आणि नवी परिस्थिती, नवी माणसं -- हे सगळं जुळवून घेत राहणं ! कशासाठी करायचा हा उद्योग ? गरज नसताना उगीचच सगळं जगण्याचं फील्डच बदलून टाकायचं आणि त्यात जमवून घेत राह्यचं ! मला हे सगळं अनावश्यक वाटत होतं ! हे मी बोलणं म्हणजे मी ज्याला मूर्खपणा समजतेय तो तुम्ही करताय असं म्हटल्यासारखं झालं असतं. म्हणून मी कारण सांगत नव्हते.

वनिताः असे कसे पण विचार तुझे ? वेड्यासारखे !

योगिनीः फक्त धोका एकच होता. लांबवर गुंतून राहणारा स्वभाव नसल्यानं कुठंतरी तात्पुरतं फशी पडण्याची शक्यता होती. तेवढं टाळलं म्हणजे झालं, असं मी ठरवलं होतं. आणि एखादे वेळेला समजा, पुढंमागं हे नाही टाळलं गेलं तरीही काय होणार आहे - असाही विचार होता.

वनिताः शहाणी आहेस, असे तुझे विचार होते हे आता बोलू तरी नकोस कुठं.

योगिनीः मी अशा विचारांतून गेलेय म्हटल्यावर कुणी लग्नच करणार नाही माझ्याशी । आता माझा विचार बदललेला असून !

वनिताः बरं बदलला कसा काय विचार ?

योगिनीः येताना ठेच लागली !

वनिताः अं ?

योगिनीः तेच सांगतेय -- तुझ्या प्रश्नाचं उत्तर. तर ठेच लागून पडले जरा. लागलंबिगलं नाही फारसं, पण पडले. रस्त्यावर. सुदैवानं एखादं भरधाव वाहन वगैरे येत नव्हतं. त्यामुळं उठून पुन्हा चालायला लागले. दोन-चारजणांनी पाहिलं. ' सावकाश हो बाई ' असं कुणीतरी म्हणालं. पण त्याचवेळी जर एखादं वाहन जोरात आलं असतं तर काय झालं असतं ? म्हणून म्हणायचं की सुदैवानं असं काही झालं नाही.

वनिताः बरं झालं बाई ! बचावलीस म्हणजे !

योगिनीः त्यामुळंच घरी येईपर्यंत विचार बदलला माझा ! म्हणजे असं बघ -- आपण तिघं आता या घरात राहतोय. रवी, तू - त्याची बायको वनिता आणि मी - त्याची बहीण योगिनी हे कॉम्बिनेशन तरी कसं तयार झालं ? रवी इन्शुरन्स कंपनीत कारकून, तू इन्कमटॅक्समध्ये कारकून, मी स्पार्क इंजिनियर्समध्ये कारकून -- हेही कसं झालं ? या सगळ्या गोष्टींचे एकमेकांवर परिणाम होतच

असणार आहेत. ते ठेच लागून बचावल्यामुळं हा विचार आला डोक्यात. असं कण न् कण आपल्याला ठरवता येतच नाही. कुठं तरी दुर्लक्ष होणं, कुठंतरी ठेच लागणं हे होणारच. कुठलेही निर्णय घेऊन कसंही वागलं तरी. मग सरळ तुम्हा सगळ्यांच्या म्हणण्याप्रमाणे लग्न केलं तरी काय हरकत आहे - असं वाटलं मला. नाही तरी लग्न करण्यामध्ये फार काही मोठा आनंदाचा ठेवा दडलेला आहे असं मला वाटत नाहीच. मग केलं तरी काय बिघडतंय ? म्हणून करायचं ठरवलं लग्न ! शेवटी कुठंही झालं तरी आपल्याला आपल्या स्वभावानंच जगायचं आहे ! राहील होत काही ना काही ! उगीचच वेगळं वागायची तरी काय गरज आहे ? म्हणून ठरवलं, करायचं लग्न !

वनिताः ( हसून ) जाऊ दे ! तुझा पहिला निर्णय आणि नंतरचा बदललेला निर्णय या दोन्हींच्या पध्दतीत मला काही तथ्य वाटत नाही. पण शेवटी लग्न करायचा तुझा निर्णय झालाय हे छान आहे !

योगिनीः हे मला वाटलंच होतं ! म्हणूनच सगळं सांगायला काही हरकत नाही असं वाटलं मला. तुला हे दोन्ही निरर्थकच वाटणार आहे तर टाकावं सांगून--असं ! पण माझ्या दृष्टीनं हे सगळं असं घडलं हे खरं आहे !

वनिताः पण हे असलं कुठं बोलू नकोस !

योगिनीः ' वेड्यासारखं ' ! -- हे नाही म्हणालीस ?

वनिताः हो -- वेड्यासारखंच !

योगिनीः पण मला एक सांग -- हे असं विचारच ज्यांच्या डोक्यात येत नाहीत किंवा हे असंच करायचं असतं हे आधीच ज्यांना मान्य आहे, ते जास्त शहाणे कसे ? ( इथे टेलिफोनची रिंग वाजते. वनिताच्या चेहऱ्यावर स्मित. ती उठून जाते आणि फोन उचलते.)

वनिताः ( फोनवर ) हं, मी वनिताच बोलतेय ! कोण, अण्णा ! हं बोला ! हो, छान आहे ! रवी, योगिनी, मी सगळे छान आहोत ! आणि आनंदाची बातमी ! योगिनीनं लग्न करायचं ठरवलंय ! हो, आजच बदलला विचार तिचा ! आजच म्हणजे आत्ताच ! तेच सांगत होती ती मला ! तेवढ्यात तुमचा फोन आला ! तिकडं कसं काय सगळं ? हं ! तुमची तब्येत ? हं,दादावहिनी काय म्हणतायत ? ठीक सगळं ? बेबी काय म्हणतेय ? दंगा करत असेल ! ठेवताय फोन ? हं ! बरं !( फोन ठेवते. ) अण्णांचा फोन होता ! आठवण आली असेल माझी ! नागपूर काही तसं जवळ नाही. पण फोन फारसा कधी आला नव्हता त्यांचा. नुसतं खुशाली विचारण्यासाठी केला म्हणाले.

योगिनीः ठीक आहेत नं सगळे ?

वनिताः हं --

योगिनीः मी लग्नच करणार नाही म्हटल्यावर इथं तर मी कायम राहू शकणार नव्हतेच. तोही विचार केला होता मी.

वनिताः आता कशाला हवंय ते ?

योगिनीः दुसरं म्हणजे आमचे थोरले बंधुराज महेंद्र ! तो स्वतः आणि त्याचा संसार याच्याबाहेर नजरच पोचत नाही त्याची. तो काही माझ्या लग्नाच्या बाबतीत काही करेलसं मला वाटत नाही. मग रवीवरच कशाला टाकायचा भार ? आणि मुख्य म्हणजे गरज काय एवढं सगळं करायची ? -- असे सगळे विचार होते. ( दारावरची बेल वाजते. वनिता जाऊन दार उघडते. रवींद्र येतो.) हं, तर रवी, मी लग्न करायचं ठरवलं आहे. महेंद्रदादा यात काही लक्ष घालणार नाही हे स्पष्ट आहे. हे सगळं तुमच्यावरच आहे. काय विचार आहे तुझा ?

रवींद्रः अरे, हो हो हो ! आत तरी येऊ दे की मला ! कधी बदलला विचार ?

योगिनीः आत्ताच !

( अंधार होत जातो. पुन्हा प्रकाश पडतो तेव्हा रविवार दुपार. समोर रवींद्र आणि वनिता. )

रवींद्रः तिचे चाळीसएक हजार आहेत. आपण वीसपंचवीस घालू, महेंद्रला दोष देण्यात अर्थ नाही. एकखांबी तंबू आहे त्याचा. आणि योगिनीलाही आपले तिच्यावर उपकार आहेत असं वाटता कामा नये. मी तसं सांगतोच तिला. आणि तिला हेही सोगितलंय की, आधी विचार काय होते, बदल का झाला ते सगळं विसरून जा आणि नॉर्मल राहा. नॉर्मल म्हणजे लग्न करायचं आहे हे ठरल्यावर विचारांचे, निवडीचे जे फरक असतील ते चालेल ; पण अगदीच आर्टफिल्म नको. आता तसा काही प्रॉब्लेम नाही. होऊन जाईल. आता बघायला सुरुवात करायला हरकत नाही. तुझ्याबद्दल ती

फार समाधानानं बोलत होती. आपल्याला कराव्या लागणाऱ्या खर्चाबद्दल तू कधीच नाराजी दाखवली नाहीस. अर्थात बहिणीच्या लग्नाची जबाबदारी आहे हे तुम्हाला आधी सांगितलेलं होतंच म्हणा. पण तरीही जुनी कर्ज फिटलेली आहेत.घर झालेलं आहे. त्याचे हप्ते जात राहतील. आता मेजर प्रॉब्लेम काही नाही. त्यामुळं -- आणि दादाचा अंग काढून घेण्याचा जो प्रकार आहे तोही थोडाफार कशावर आधारलेला आहे ? -- तर आपण असं बेफिकीरीनं वागणार नाही या विश्वासावर. मला वाटतं तेवढं ठीक आहे.

वनिताः तिचा स्वभाव मात्र जरा काळजी वाटावी असा आहे, तेही तिला मधनं मधनं समजावायला हवंय --

रवींद्रः अगं, तसं म्हटलं तर माझाही तिच्यासारखाच आहे स्वभाव. कुणात गुंतून राहणं तसं माझ्याही स्वभावात नाही. फार फार तर काय होतं यामुळं ? माणूस जरासा जास्त व्यवहारी होऊ शकतो. काही बिघडत नाही.( योगिनी चहाच्या कपबशांचा ट्रे घेऊन येते.)

योगिनीः कशानं काही बिघडत नाही ?

वनिताः व्यवहारीपणानं !

योगिनीः व्यवहारीपणानं बिघडेल कसं ? फसायची शक्यता कमी ! व्यवहारी माणूस हा नेहमी सावध असतो.

वनिताः पण त्यातून फार कॅल्क्युलेटेड वागणं आणि बेफिकिरीही येऊ शकते. त्याचे परिणाम चांगलेच होतील असं नाही.

योगिनीः आता मी लग्न करायचं ठरवलं, त्यात कॅल्क्युलेशन काय आहे ?

वनिताः नाहीय तर चांगलंच आहे !

रवींद्रः हिचं ते हस्तरेषाशास्त्राचं वाचन चालतं नं त्यामुळे ती असं काहीतरी बोलते. दुसरं काही नाही.

वनिताः शक्य आहे.

योगिनीः बरं, रवीचा हात तुला माहीत आहे. कसा आहे काळ त्याचा सध्या ?

वनिता : ताणतणावाचे दिवस आहेत. पण ठीक आहे.

योगिनीः कशा प्रकारचे असतील हे ताणतणाव ?

वनिताः ते सगळं वर्णन करण्याइतका माझा अभ्यास नाही गं ! पण जवळच्या संबंधातले असू शकतील ! नोकरी वगैरे व्यावहारिक जगात काही नाही.

योगिनीः मी तर नसणार आहे ना कारण !

वनिताः जाऊ दे गं ! मी नसेन कशावरून ? हे एक प्रकारचे अंदाज असतात ! त्याहून जास्त महत्त्व देत बसू नये त्याला !

योगिनीः तसं काही झालंच तर मी हेल्पिंग हँडची भूमिका घेईन.

वनिताः हे छान आहे तुझं ! घडणाऱ्या घटनांसाठी आपल्याला असं काही करावं लागत नाही. आपल्या नेहमीच्या जगण्यातूनच त्या आपल्या दाराशी चालत येतात.
( इथं बेल वाजते. तिघांचाही चहा पिऊन झालेला आहे. योगिनी ट्रे आत घेऊन जाते. वनिता दार उघडायला जाते. रवींद्र सहज बसून राहतो. वनिता दार उघडते. दारात नयना.)

नयनाः वनिता रवींद्र वेखंडे इथंच राहतात का ?

वनिताः हो. मीच. या नं आत ! ( ती आत येते. रवींद्र बेडरूमकडे जातो.)

नयनाः मी नयना शारंगपाणी. माझं तुमच्याकडे एक काम आहे.

वनिताः बसा नं. ( नयना बसते. मग वनिता बसते.)

नयनाः तुम्ही सहकार महिला मंडळाच्या सभासद आहात का ?

वनिताः होय.

नयनाः मी स्त्रीसमता आघाडीची कार्यकर्ती आहे. मागे म्हणजे सुमारे दोन महिन्यांपूर्वी आम्ही काही निवडक महिला मंडळांना काही पत्रकं पाठवली होती -- सर्व्हे करण्याच्या संदर्भात. आणि या उपक्रमाला सहकार्य द्यायला तयार असणाऱ्या कुटुंबांची नावं मागवली होती. त्यावेळी जी नावं आमच्याकडे आली त्यात तुमचं नाव होतं.

वनिताः हो. मी दिलं होतं नांव.

नयनाः तर आता ती पाहणीची आणि निरीक्षणाची योजना आम्ही सुरू करतोय. सुमारे पन्नास कुटुंबं निवडायचा विचार आहे. एकेक कार्यकर्ती या कुटुंबात एक महिनाभर राहील आणि आपल्या

डायरीत तिची निरीक्षणं नोंदवून ठेवेल. आधुनिक काळात नव्या प्रश्नांना सामोरे जाताना दृष्टिकोण कसे आहेत याचा एक डेटा आम्हाला तयार करायचा आहे. त्यावर अभ्यास,चर्चा होऊन मग सर्वमान्य असा काही सामाजिक किंवा प्रातिनिधिक भाग त्यात आहे का हे पाहून आम्ही काही धोरणं आखणार आहोत आणि पुढे त्याप्रमाणे कार्य करायची योजना आहे.

वनिताः अशा पन्नास कार्यकर्त्या पन्नास परक्या कुटुंबांत राह्यला तयार आहेत ?

नयनाः होय. प्रथम आम्ही सुशिक्षित मध्यमवर्गीय कुटुंबं निवडली आहेत. यात धोका कमी हा एक भाग तर आहेच, पण यातून ज्या सुधारणांची गरज भासेल ती सर्व वर्गांना उपयोगी पडेल असा आमचा अंदाज आहे. उदाहरणार्थ, बायकोचा चारचौघात अपमान करणं हे वाईट आहे म्हटल्यानंतर तिला रस्त्यात मारहाण करणं वाईट आहे हे वेगळं सांगायची गरज नाही. अर्थात, एक उदाहरण दिलं मी. आणि मुख्य म्हणजे कुठल्याही गोष्टी या आता अन्याय करायचा असं ठरवून होत नाहीत -- त्या अंगवळणी पडलेल्या परंपरागत सवयीतून होतात - अशा विचारानं ही पाहणी करायची असल्यामुळे याचा उपयोग होईल असं वाटतं. यात कुठंही कुणाच्याही नावांना महत्त्व राहणार नाही. म्हणजे येणारच नाहीत ती. हं,आणि असंही एक गृहीत धरलेलं आहे की, आधुनिक प्रश्नांचे संदर्भ मध्यमवर्गीय कुटुंबांत अधिक प्रमाणात आणि अधिक स्पष्टपणे मिळतील.

वनिताः एखाद्या कुटुंबात राह्यचं, तिथली माणसं कशी वागणूक आपल्याला देणार हे माहीत नाही - अशा स्थितीत पन्नास कार्यकर्त्या आहेत ?

नयनाः हो, आहेत. याचे इतर तपशील बरेच आहेत. ते आपल्याला बोलता येतील.पण तुम्ही जर म्हटल्याप्रमाणे या योजनेला सहकार्य देणार असाल तर मी स्वतःच हे काम करणार आहे. एक महिना मी तुमच्या कुटुंबात राहीन.

वनिताः एक विचारलं तर रागावणार नाही ?

नयनाः अशी प्रस्तावना असलेले बरेच प्रश्न तुम्ही मला विचाराल, विचारले पाहिजेत याची मला कल्पना आहे.

वनिताः तुमच्यासारख्या जर अशा सुंदर,आकर्षक कार्यकर्त्या असतील तर त्या नसलेले प्रश्न निर्माण करतील असं नाही तुम्हाला वाटतं ?

नयनाः त्याचाही विचार झालेला आहे. तसं काही होणार नाही अशी खात्री बाळगलेली आहे. आणि या कामाचं महत्त्व पटणाऱ्या या कार्यकर्त्या आहेत.

वनिताः ठीक आहे. माझी तशी हरकत नाही. पण माझे मिस्टर घरी आहेत. त्यांच्याशीही आपण चर्चा करू. माझी नणंदही आहे. सर्वांशी बोलून मगच याबाबत ठरवावं असं मला वाटतं. नाव देताना मी फारसा विचार केला नव्हता.

नयनाः हरकत नाही. बोलवा त्यांना. ( वनिता ' आलेच हं ' म्हणून आत जाते. काही क्षण असे जातात. नयना समोरचे मासिक, वर्तमानपत्र पाहते. मग योगिनी येते. टेपरेकॉर्डर चालू करते.)

योगिनीः मी वनिताची नणंद. योगिनी माझं नाव. बसा हं. येतोच आहे रवी. ( जाते. काही क्षण गाणे चालू राहते. मग वनिता आणि योगिनी येतात.मागोमाग रवींद्र येतो.)

वनिताः या--सॉरी--सौ.का कु. ?

नयनाः कु. !

वनिताः या कुमारी नयना शारंगपाणी.( रवींद्र पाहतो पण आपण थोडंफार लाईटली घेतोय असं दाखवायचा प्रयत्न करतो.) आणि हे माझे मिस्टर रवींद्र वेखंडे.

नयनाः नमस्कार.

रवींद्रः नमस्कार.

वनिताः ही नणंद कुमारी योगिनी वेखंडे.

नयनाः नमस्कार.

योगिनीः नमस्कार.

रवींद्रः तुमची योजना हिनं थोडक्यात सांगितली. सविस्तर बोलावं लागेलच. पण माझे एक-दोनच प्रश्न आहेत. असं सहकार्य द्यायला तुमच्याकडं नावं आली किती ? आणि त्यातली पन्नास कुटुंबं तुम्ही कशी निवडली आणि प्रत्येक कुटुंबात कोणत्या कार्यकर्तीनं जायचं हे तुम्ही कसं ठरवलंत ?

नयनाः (हसून) नावं एकशे पाच आली. त्यातली पन्नास निवडण्याऐवजी प्रत्येक कार्यकर्तीनं आपापली निवड सांगितल्यावर ती पन्नास कुटुंबं ठरवली. यात थोडेसे बदलही होऊ शकतील. निवड करताना काही कार्यकर्त्या स्त्रियांनी थोडी ओळख, थोडी माहिती यावरही निवड केली आहे. पण सगळ्यांनीच असं केलेलं नाही. या सगळ्या प्रकारात थोडेफार दोष राहण्याची शक्यता आहे ; पण तरीही सुरुवात करायचं ठरवलेलं आहे.

रवींद्रः मी काही समाजशास्त्रज्ञ नाही. पण वेगवेगळ्या सांस्कृतिक गटांतल्या कुटुंबांचे प्रश्न वेगवेगळे असतात असं मला वाटतं. मग याचा उपयोग काय ?

नयनाः शेवटची शक्यता म्हणजे याचा काहीच उपयोग नाही. या अशा प्रयत्नाची गरज आहे. पुढील दिशा तरी दिसू शकेल.

रवींद्रः समजा, तुमचा हा प्रयत्न मला निरर्थक वाटत असेल तर आम्ही कशासाठी सहकार्य द्यायचं ?

नयनाः एक म्हणजे कुटुंबातल्या सगळ्यांनाच हा प्रयत्न निरर्थक वाटतो का हे पाहावं अशी विनंती आहे. सगळ्यांनाच निरर्थक वाटत असेल तर प्रश्नच मिटला. पण दुसऱ्या कुठल्यातरी कारणाऐवजी ' निरर्थक वाटणं ' हे कारण सांगू नये अशीही विनंती आहे. त्यापेक्षा ' आम्ही सहकार्य देऊ इच्छित नाही ' असं सांगितलं तर बरं होईल.

वनिताः नाही. तसं काही नाही.

योगिनीः तुमचा इथं राहण्याचा खर्च ?

नयनाः मिळेल. तो सगळा तपशील बोलण्यापूर्वी मुळात तुमची मान्यता आहे का हे महत्त्वाचं आहे.

योगिनीः म्हणजे आमचं सगळं खाजगी जीवन, कौटुंबिक प्रश्न हे तुम्ही पाहात राहणार ?

नयनाः हो. पण त्यात मी भाग घेणार नाही. आणि नावांचा उल्लेख कुठेच येणार नाही.

योगिनीः म्हणजे तुम्हाला एखाद्या गोष्टीबद्दल काय वाटतं हे तुम्ही लिहून ठेवणार ?

नयनाः शक्यतो वस्तुस्थिती नोंदवणार. पण तरीही थोडाफार माझा दृष्टिकोण येणारच.

योगिनीः असं करायची तुमची काय खास योग्यता आहे ? सॉरी हं, रागावू नका.

नयनाः तसं माझं काही म्हणणं नाही. पण या सगळ्या कमतरता लक्षात घेऊनही स्त्री समता चळवळीसाठी काही गोष्टी उपयोगी पडतील असा विचार आहे.

रवींद्रः ठीक आहे. आमची मान्यता आहे. तुम्ही आता या दोघींना तुमची स्वतःची सविस्तर माहिती सांगा. बरंय. चालूं द्या -- ( आत जातो.)

नयनाः आभारी आहे. मी कुमारी नयना शारंगपाणी. राज्यशास्त्र घेऊन मी ग्रॅज्युएट झाले आहे. वडील आहेत. आई नाही. एक मोठा भाऊ आहे. तो एका खाजगी कंपनीत नोकरीला आहे. त्याचं लग्न ठरण्याच्या बेतात आहे. सध्या त्या दोघांच्या मिळकतीवर कुटुंब चालू आहे. मी नोकरीच्या शोधात आहे. पण सुमारे एक वर्षापासून मी या चळवळीत ओढली गेले. नोकरी मिळाली तरी हे कार्य ...( हळूहळू प्रकाश अस्पष्ट होत जातो...अंधार होतो. पुन्हा प्रकाश पडतो तेव्हा समोर कुणीही नाही. रवींद्र आणि योगिनी दार उघडून बाहेरून आत येतात. दिवे लावतात.)

योगिनीः मी त्या दोघींबरोबर भाजी वगैरे घ्यायला मुद्दामच थांबले नाही. मला जरा तुला या बाबतीत काही विचारायचं होतं.

रवींद्रः विचारायचं असेल आणि सांगायचं असेल.

योगिनीः हो, दोन्हीही. एखाद्या परक्या तरुण स्त्रीला घरात ठेवून घेण्याचा धोका कशासाठी पत्करायचा आपण ? उद्या समज तिनं तुझ्यावर भलताच आळ घेतला तर ?

रवींद्रः तिच्या चेहऱ्यावरून, बोलण्यावरून ती तशी वाटत नाही. शिवाय ती काही फॉर्मस् भरणार आहे. तिच्या स्त्रीसमता आघाडीचं पत्र देणार आहे. तुम्ही दोघी जाऊन तिचं घर बघून येणार आहात. एवढ्या सगळ्या गोष्टी झाल्यावर मला काही असा धोका वाटत नाही.

योगिनीः पण कशासाठी करायचे हे नसते उद्योग ?

रवींद्रः हे बघ, आपल्या समाजात स्त्रियांना जरा दुय्यमच स्थान आहे, हे मलाही पटतं. त्यामुळं त्यांच्यावर काही अन्यायही होत असतील. ते दूर करायचा त्यांनी प्रयत्न करणं, अधिक मोकळेपणानं आणि स्वतःच्या कुवती अधिक विकसित करायची संधी घेत जगण्याच्या शक्यता तयार करण्यासाठी त्यांनी प्रयत्न करणं हे मला काही वावगं वाटत नाही. या बाबतीत पुरुषांचे इंटरेस्ट जपण्याची वगैरे

मला इच्छा नाही. शिवाय उदाहरणार्थ, तू एक स्त्री आहेस. तुला अधिक चांगलं जगता आलं तर मला वाईट वाटेल की चांगलं ? समाजातल्या या प्रक्रियेला हातभार लावायला काही हरकत नाही. शिवाय एक महिन्याचा तर प्रश्न आहे. आणि सामाजिक स्तरावर या गोष्टींची चर्चा होणं हे हेल्दी वाटतं मला. त्यामुळं जराही या प्रयत्नाला मदत करू नये किंवा यात अडथळे आणावेत किंवा आपल्याला काहीच त्रास नको -- झीज नको -- अशा त्रयस्थ भूमिकेतून वागावं असं मला वाटत नाही.

योगिनीः ती आपली निरीक्षणं नोंदवत राहणार हे मला तरी कमीपणाचं वाटतं.

रवींद्रः यात कमीपणा काही नाही. तिची मतं काही अंतिम नाहीत किंवा ती जशीच्या तशी मान्य होतील असं नाही. आणि यात गुप्तता राहणार आहे.पुन्हा कशाला संबंध येतोय ? चालेना का विचारमंथन परस्पर ! पण पुरुष अशा प्रयत्नांना घाबरतात किंवा सहकार्य द्यायचं टाळतात असंही होणं चांगलं नाही. वनिताला आणि तुलाही ते खटकू शकेल.

योगिनीः मला तर एक कळत नाही की इतकी धडपड करायची खरंच गरज आहे का ? स्त्रिया जास्त शिकल्या, त्यांची शक्ती वाढली की आपोआप होणाऱ्या गोष्टी आहेत या, असं कृत्रिमपणे प्रयत्न करायची काही आवश्यकता नाही.

रवींद्रः ते बरोबर आहे तुझं, पण शक्ती वाढायला जशी कृत्रिम टॉनिक्स देतात तसाच याही प्रयत्नांचा काही परिणाम होईल. हाही आपण एक समाजाच्या जगण्याचा भाग म्हणून पाहायचं. अनुकूल वातावरण तयार करायला तरी याचा थोडाफार उपयोग होईल.

योगिनीः फारच धीरोदात्त भूमिका घेतोयस तू. आनंद वाटला. थोडी मजाही येईल यात म्हणा ! पण ती जर का या चळवळीवर रोजची भाषणबाजी करायला लागली ...

( वनिता आणि नयना येतात. वनिताच्या हातात भाजीची पिशवी.)

नयनाः तर ही योजना त्याक्षणी थांबवण्यात येईल ! शिवाय दुसऱ्या कुठल्याही कारणानं हे सगळं मधेच थांबवायचा सगळ्यांनाच अधिकार राहील. यात सक्ती कोणतीच नाही.

योगिनीः ऐकलंत वाटतं माझं बोलणं ?

नयनाः काही बिघडत नाही. या सगळ्या गोष्टींची मला अपेक्षा होतीच. जेवण छान झालं ! आणि या निमित्तानं तुम्हा सर्वांबरोबर राहण्याचा एक छानसा अनुभव मला मिळेल असं मला वाटतं. उद्या संध्याकाळी मी वनिताला...हो, आपण तिघींनी एकेमेकींना एकेरीत ओळखायचं ठरलेलं आहे. तर तिला मी माझ्या घरी घेऊन जाईन. नंतर तिच्याबरोबरच मी इथे येईन. एकदा या सुरुवातीच्या गोष्टी झाल्या की पुन्हा सारख्या चर्चा, मतमतांतरं करत बसावी लागणार नाहीत.

वनिताः बस हं, आलेच.( पिशवी घेऊन आत जाते.)

योगिनीः तुम्ही बसा बोलत. मी जरा कपडे बदलून येते.

( तीही आत जाते. रवींद्र बसलेला. एखादे मासिक हातात घेतो. नजर मासिकात. नयनाही बसते. काही क्षण. मग -- )

नयनाः तुम्हाला आवडलेलं नाही का हे सगळं ?

रवींद्रः ( वर न पाहता) तसं काही नाही.

नयनाः मला वाटलं रागबीग आलाय की काय ?

रवींद्रः ( खालच्या आवाजात ) मला एकच सांग, तू आमचं घर कशासाठी निवडलंस ?

नयनाः ओह, म्हणजे ओळख आहे आपली आधीची !

रवींद्रः प्रश्नाचं उत्तर दिलं नाहीस.

नयनाः तुला काय वाटतं, काही तरी विध्वंसक हेतू असेल ? इतकी चीप वागेन मी असं वाटतं ?

रवींद्रः मी तुला प्रश्न विचारलेला आहे.

नयनाः तसं काही ठरवलेला हेतूबितू नाही. पण योगायोगानं हे नाव दिसलं आणि अचानक मनानं हेच निवडायचं ठरवलं.

रवींद्रः तुझं लग्नाचं वगैरे जुळलेलं नाही वाटतं कुठं ?

नयनाः नाही. म्हणजे खरं तर प्रयत्नच फारसा केलेला नाही.

रवींद्रः का ?

नयनाः मला एक सांग, आपल्याला हे असंच ठेवायचं आहे ना ? अनोळखी ? आणि आत्ताच ओळख झाल्यासारखं ? मला असंच ठीक वाटतंय.

रवींद्रः अर्थातच !

नयनाः नाही तर मूळ काम राहायचं बाजूला ! पण तू कधी वनिताशी माझ्याबद्दल बोलला होतास का ?

रवींद्रः काही कारण पडलं नाही. आणि मुद्दाम तुझ्याबद्दल बोलावं असं काय होतं ?

नयनाः ते आहे म्हणा ;पण विश्वासानं आपापले भूतकाळ बोलले जात असतील एकमेकांशी असं वाटलं मला.

रवींद्रः 'विश्वासानं' बोलायला पाहिजे असं काही नव्हतंच तर कशाला उगीचच विषय वाढवायचे ?

नयनाः हं ! बरं, आपली पूर्वीची ओळख नाही असं दाखवायचं हे तर तू एका सेकंदात ठरवलं असणार. ते कसं ठरवलंस ?

रवींद्रः ते उत्स्फूर्तपणे ठरलं ते ठरलं !

नयना उत्स्फूर्तपणे ' ओह् नयना ' असं म्हणाला नाहीस !( वनिता येते. )

रवींद्रः हा एक सततचा प्रवाह असतो समाजात. त्यामुळे बदल होत राहतात. ते कोणी रोखण्याचा प्रश्नच येत नाही. काम तसं महत्त्वाचं आहे.

नयनाः सगळ्या गोष्टी आपण संपूर्ण ज्ञानानं करत असतो असं नाही. काय करायचं आहे हेही निश्चित माहीत असतं असंही नाही. पण ही प्रक्रिया चालू रहाण्याचं महत्त्व असतं. ती प्रक्रियासुध्दा परिणाम घडवत राहते. सगळं मिळून घडत राहतात बदल.

वनिताः ( बसत ) आम्हालाही काही इंटरेस्टिंग गोष्टी ऐकायला मिळतील, समजतील.

नयनाः थोडं थोडं जे बऱ्याचजणांना जाणवत असतं तेच स्पष्टपणे आणि उघडपणे म्हणत राहाणं महत्त्वाचं असतं.

वनिताः बरं, समजा, आजची डायरी जेव्हा तू लिहिशील तेव्हा आजची नोंद काय असेल ?

नयनाः माझ्या नोंदी गुप्त राहाव्या अशी मात्र माझी इच्छा आहे. पण आजच्यापुरतं सांगते. या घरातल्या दोन्ही स्त्रिया शिकलेल्या आहेत. पुरुषाप्रमाणेच नोकरी करणाऱ्या आहेत. पण या योजनेला ' ठीक आहे. आमची मान्यता आहे ' असं पुरुषच म्हणाला -- फायनल संमती पुरुषानं दिली. ही आजची नोंद असेल.

रवींद्रः ( वनिताला ) बघितलंस ? हे आहेच नोंदवण्यासारखं. सवयीनं वागताना आपल्या लक्षात येत नाही.

वनिताः पण हा पुरुषप्रधानपणा असतोच सगळीकडे. यात नवीन काही नाही. आणि या ज्या पन्नास कार्यकर्त्या आहेत त्यांनी आपापल्या घरातल्या नोंदी दिल्या असत्या तरी हे सगळं आलं असतं त्यात.

नयनाः त्यात आपण स्वतः इन्व्हॉल्वड असतो. आणि जगत असताना आपलं तेच एक काम नसतं. योग्य तो तटस्थपणा येत नाही. काही गोष्टी न बोलण्याकडे कल होतो. वैयक्तिक नात्यांचे प्रकार असतात.

वनिताः हं !

नयनाः बरं, मी आता जाऊ का ? उद्या संध्याकाळी तू माझ्या घरी येणार आहेस. मग आपण इकडे येऊ.(उठते.)

वनिताः हं -- चालेल ! ( उठते. )

नयनाः ( रवींद्रला ) अच्छा ! योगिनीला सांगा.

वनिताः हो. ( ती दारापर्यंत जाते. नयना जाते. वनिता दार लावून येते.)
जाईन मी उद्या तिच्या घरी ठरल्याप्रमाणे ; पण तिच्या बोलण्यावरून ती चांगली वाटते. संशयास्पद काही वाटत नाही.( योगिनी येते. )

योगिनीः गेली नयना !

वनिताः हो.

रवींद्रः ठरल्याप्रमाणे जाऊन ये. आपला सावधपणा राहणार आहे हे माहीत असलेलं बरंच तिला.

योगिनीः कशाबद्दल ? सावधपणा ?

वनिताः काही नाही गं -- पूर्ण विश्वासावर चालायला नको असं म्हणत होता तो.

योगिनीः हं, ते बरोबर आहे. माझ्या लग्नाच्या निमित्तानं बऱ्याच नोंदी मिळतील तिला.

वनिताः काय, सरळ लग्नासारखं लग्न करायचं !

योगिनीः तसं नाही. आता माझा काही प्रेमविवाह होणार नाहीय. दाखवून-सवरून ठरवायचंय आणि या पध्दतीत माझा अभिमान जपला गेला पाहिजे हा आपला आग्रह ठेवायचा.

वनिताः म्हणजे काय ?

योगिनीः म्हणजे उदाहरणार्थ मुलगी बघण्याचा किंवा दाखवण्याचा कार्यक्रम नाही. मुलगा-मुलगी बघण्याचा कार्यक्रम !

रवींद्रः असला शब्दच्छल करत बसण्यात काही अर्थ नाही. काही नसताना मुलगी जरा आगाऊ दिसतेय असा पूर्वग्रह फक्त तयार होईल यातून.

योगिनीः हो पण ' बर ठीक आहे. मुलगा-मुलगी बघण्याचा कार्यक्रम ' असं जर ते म्हणाले तर माणसं उदार-समंजस मनाची दिसतात असा एक चांगला पूर्वग्रह आपलाही तयार होऊ शकेल !

रवींद्रः लग्न करायचं आहे की नाही तुला ?

योगिनीः आणि तो जो कोण असेल त्याला ?

रवींद्रः हे सगळे विचारविनिमय नंतर होऊ शकतात. उगीच शब्दावर अडून बसू नये.

योगिनीः लपवालपवी कशाला ? आपली यात काय अपेक्षा असणार आहे हे शब्दावरून कळलं तर बरंच की ! आणि मला लग्न करायचं आहे हे खरं. ठरवलेलं लग्न करायचं आहे, हेही खरं -- पण काळानुसार त्यात बदल हवेत. मी काही दाराआडून बोलणारी,पतीवर पूर्णपणे अवलंबून असलेली स्त्री नाही.

रवींद्रः च्यायला, डोकं खाणार म्हणजे तू आमचं !

योगिनीः एक आहेच. तू जबाबदारी घेणार आहेस म्हणून माझं सगळंच मी सोडून देणार नाही.

रवींद्रः बघू प्रश्न येतील तेव्हा.

योगिनीः हुंडा नाही. लग्नाचा खर्च अर्धाअर्धा.

रवींद्रः मी घेतलाय पण हुंडा !

योगिनीः तो माझा निर्णय नाही.

रवींद्रः विरोध तरी केला होतास ?

योगिनीः पाठिंबाही दिला नव्हता. मी गोंधळलेली होते.

रवींद्रः व्हेरी गुड ! उद्या मी अभ्यंकरांना फोन करणार आहे. ते म्हणतील तेव्हा एकमेकांना पाहण्याचा कार्यक्रम ठरवतो.

योगिनीः आपल्यालाही सध्या सोयीस्कर आहे. आणि खरं म्हणजे त्यांनीही तुला फोन का करू नये ? पण ते जाऊ दे. सगळं एकदम नको.

वनिताः आपण या सगळ्या गडबडीत हे नयनाचं एक स्वीकारण्यापेक्षा जरा पुढं ढकलायला सांगायला हवं होतं तिला.

रवींद्रः असू दे आता ! आता बदल केलास तर तिला वाटेल -- जाऊ दे !
( इथं प्रकाश अस्पष्ट होत जातो. अंधार. पुन्हा प्रकाश पडतो तेव्हा समोर चौघेही आहेत. तिघी बसलेल्या. रवींद्र उभा, वनिता जरा गंभीर. )

रवींद्रः ( योगिनीला ) काय मग, आहेत की नाही माणसं 'उदार मनाची आणि समंजस '! मुलगा इंजिनिअर आहे. तुझ्या म्हणण्याप्रमाणं सगळं झालं. लग्न ठरल्याप्रमाणे दणक्यात होईल.

योगिनीः तुझ्यासारखा माझा भाऊ असल्यावर माझं काय कमी होणार आहे ?

रवींद्रः तुझे चाळीसपन्नास आणि आमचे पंचवीसतीस घालून आपापल्या नातेवाईकांचे आहेर वगैरे सोडले तर खर्च अर्धाअर्धा असल्यानं मस्त दणक्यात होईल लग्न ! ( त्याचे वनिताकडे लक्ष जाते. ) पण वनिता, तू अशी गप्प गप्प का ?

वनिताः नाही, तसं काही नाही.

योगिनीः नाही कसं ? मीही तेच विचारणार होते.एखादी गोष्ट पटली नसली तर सांगून टाक वहिनी !

वनिताः नाही, तसं काही नाही ( रडू लागते. )

रवींद्रः वेड्यासारखं वागू नकोस. सांग काय ते --

वनिताः	( कसंबसं -- आवरत ) नागपूरहून फोन आला होता. दादा हॉस्पिटलमध्ये आहे. बायपास सर्जरी करावी लागणार आहे. कसं सांगावं तोच विचार करत होते. शक्य तेवढी पैशांची मदत मागितलीय. शक्यतो वीस पंचवीस हजार --

रवींद्रः	अगं, सांगायचं !-- कळणार कसं आम्हाला !

योगिनीः	आणि नयना, तूही अगदी कराराप्रमाणे गप्प राह्यची गरज नाही. ओळख नव्हती तेव्हा ठीक होतं. आता तू काही परकी नाहीस --

नयनाः	नाही, तसं मीही समजत नाही.

वनिताः	खरं तर त्यांनी आधी फोन केला होता तो हे कळवण्यासाठीच पण त्या दिवशी योगिनीचा चांगला निर्णय झाल्याचं मी बोलले म्हणून ते काही बोलले नाहीत.

रवींद्रः	वीस-पंचवीस हजार कर्जाऊ मागितलेत ! ( कुणी काही बोलत नाही.) प्रॉब्लेम आहे मग ! ( काही क्षणांनी वनिताला ) काय करता येईल ?

वनिताः	मला तर काही सुचत नाही.( काही क्षण जातात. ) त्याची मिळकत काही फार नाही. पण एकच बहीण म्हणून माझ्या लग्नाच्या वेळी त्यानं वडिलांकडे पंधरा हजार दिले होते. त्याच्यावर तसंच संकट असल्याशिवाय मला असं विचारणार नाही तो--आणि बरा झाल्यावर तो लवकरात लवकर पैसे फेडेल याची काही शंका नाही.

रवींद्रः	हे अत्यंत मेजर आणि सीरियस ऑपरेशन असतं ! पण पूर्वी कधी त्यांची अशी काही तक्रार नव्हती.

वनिताः	अलिकडं धाप लागत होती त्याला. ऑपरेशनचं हे आता सांगितलंय -- तपासण्या झाल्यावर. मला जावं लागेल लगेच. मी रात्रीच्या गाडीनं निघावं म्हणते.

योगिनीः	त्याचा प्रश्नच नाही. तुला तिथं असायलाच पाहिजे.

नयनाः	( वनिताला ) घरी कोणकोण आहे ?

वनिताः	आईवडील, तो, त्याची बायको आणि मुलगी.

नयनाः	मुलगी लहान असेल.

वनिताः	हो, तीन वर्षांची आहे.

रवींद्रः	प्रॉब्लेम आहे च्यायला ! आणि हे सगळं लग्नाचं ठरवून बसलोय आपण !

योगिनीः	का लग्नाचं जरा पुढं ढकलता येतंय का पाहावं ?

वनिताः	असं कसं ? तुझाही आयुष्याचा प्रश्न आहे.

रवींद्रः	त्यांच्याशी चर्चा करून खर्चाचं काही कमी करता येईल का बघायचं का ?

वनिताः	लग्न थाटात व्हायला हवंय ही त्यांची हौस त्यांनी सांगितलेली आहे आपल्याला.

रवींद्रः	आपण एका प्लॅनिंगनं चाललेलो असतो, त्याप्रमाणे काही कबूल करतो आणि मधेच हे असं काही आलं की अवघड होतं सालं !

वनिताः	जाऊ दे ! आपल्याला हे काही शक्य होणार नाही. मी जाते आज रात्रीच्या गाडीनं. तिथं गेल्यावरच आम्ही पाहू आणखी कुठून काय व्यवस्था होतेय ते. काहीतरी करावं हे लागेलच. होईल काहीतरी.

रवींद्रः	ह्यॅ ! या वेळी मदत करता यायला हवी होती. माझ्या मित्रांकडून वगैरे कुठं काही जमतं का पाहू का ? पण एवढं एकदम जमणं अवघडच आहे. वेळही नाहीय तेवढा.

वनिताः	नको, राहू दे ! पाहू काहीतरी तिकडेच.

योगिनीः	रवी, मला वाटतं तूही जा तिच्याबरोबर.

रवींद्र	( विचारात पडत ) मला वाटतं योगिनी, आज तू जा - कारण ऑफीसात जरा प्रॉब्लेम आहे - मी दोन दिवसांनी येईन आणि मग ऑरपेशनलाही थांबेन --मी आलो की हवं तर तू परत ये --

योगिनीः	ठीक आहे. मी जाते.

वनिताः	तशी काही आवश्यकता नाही अगं. जाईन मी --

रवींद्रः	नाही, नाही -- तसं नको - योगिनी येऊ दे बरोबर --

नयनाः	चला मग, मी मदत करते तुम्हाला आवराआवरीला. मीही बाहेर पडेन तुमच्याबरोबर आणि मग घरी जाईन. स्वयंपाकघरातलं तुम्ही काही बघू नका. मी बघते सगळं.

वनिताः	तसं काही जास्त नाही काही करायचं. बस तू. दोघी आहोत ना आम्ही -- ( वनिता आणि योगिनी उठतात.नयनाही उठते -) बरं चल -- ( त्या तिघी आत जातात. रवींद्र बसतो. पायावर पाय टाकून

पाय लांब करतो. काही क्षण एकटा विचारात बसून राहतो. प्रकाश अस्पष्ट होत अंधार होतो. पुन्हा प्रकाश पडतो तेव्हा दहा-बारा दिवस उलटून गेले आहेत. समोर कुणी नाही. आतून टेपरेकॉर्डरचा आवाज. काही क्षणांनी बेल वाजते. आतून रवींद्र येतो. दार उघडतो. नयना आत येते. दार लावते.)

नयनाः तू कधी आलास ?

रवींद्रः दुपारीच आलो.

नयनाः योगिनी नाही आली अजून ऑफिसातून ?

रवींद्रः येईलच एवढ्यात.

नयनाः तू नागपूरला गेल्यापासून मी इथंच आहे योगिनीबरोबर. कसं काय झालं सगळं ?

रवींद्रः ऑपरेशन चांगलं झालं. त्यांना घरी आणल्यावर एक-दोन दिवस थांबून मग वनिता येईल.

नयनाः हं. ( काही क्षणांनी ) पैश्याबैश्याची झाली सोय ?

रवींद्रः हो. शक्यतो जवळच्या लोकांकडून जमवावे म्हणून त्यांचा प्रयत्न होता. मागायचा एरिया थोडा वाढवल्यावर झाली व्यवस्था.

नयनाः या सगळ्या प्रकारात माझी उपस्थिती खटकत तर नाही ना तुला ?

रवींद्रः नाही. तसं काही नाही. उलट तुलाच ऑकवर्ड होतं असेल असं मला वाटलं.

नयनाः का ?

रवींद्रः तुझा काहीही हेतू असला तरी ही ऑपरेशनची घटना किंवा योगिनीचं लग्न या एवढ्या मोठ्या गोष्टी आहेत की तुझ्या हेतूला महत्त्वच राहू नये.

नयनाः या तुझ्या बोलण्यात संशय, भीती, अंदाज घेण्याची इच्छा आणि सूक्ष्मसा हल्ला आहे.

रवींद्रः छे,छे ! एवढा कुठं कोण विचार करून बोलतं का ! सहज बोललो आपलं !

नयनाः बोलण्यात तू अतिशय हुशार आहेस. मला हे काही नवीन नाही. आपापल्या स्वभावातून माणसं बोलतात, तेव्हा तीन-चार गोष्टींचा परिणाम होऊन शब्द येऊ शकतात. त्यासाठी वेळ घालवावा लागत नाही.

रवींद्रः आपण दोघं एकत्र असण्याचे प्रसंग तरी थोडेफार टाळले पाहिजेत.

नयनाः का ? भीती वाटते तुला ?

रवींद्रः भीती कसली ?

नयनाः मला काय माहीत ?( काही क्षणांनी ) आठवणी येतात का तुला ?

रवींद्रः कसल्या ?

नयनाः हा प्रश्न मी विचारतेय हे लक्षात घेतलंस तर कसल्या हे कळेल.

रवींद्रः हो, येतात कधीकधी.

नयनाः मला तर फार वेळा येतात.

रवींद्रः हे कशाला सांगतेयस ?

नयनाः मी माझ्या स्वभावातून सांगतेय, त्यामुळं बरंच काही असेल हे सांगण्यात --

रवींद्रः म्हणजे यातून तुला प्रेम, निष्ठा, पझेसिव्ह स्वभाव असलं काही दाखवायचं आहे का ?

नयनाः ' असलं काही ' म्हणतोयस त्याअर्थी क्षुल्लकच ।

रवींद्रः काय काय महत्त्वाचं धरलं जावं याचे सामान्य नियम नसतात. माणसागणिक बदलतं सगळं. तुमची चळवळ सगळी माणसं एकसाची धरून चालते.

नयनाः आपण चळवळीबद्दल बोलतो आहोत का ? ठीक आहे. तसंही बोलता येईल. दोघंही मिळवते असल्यावर आर्थिक निर्णय दोघांनी मिळून घेतलेला असावा. एकानंच त्या निर्णयाला आकार देऊ नये. याबद्दल काय तुझं म्हणणं ?

रवींद्रः ते सगळं बरोबर आहे. पण समोर येणाऱ्या कोणत्याही दोन व्यक्ती तुल्यबळ नसतात. कमीजास्त असतात. काही वेळा जास्त शक्ती असलेली व्यक्ती कमकुवत व्यक्तीसाठी त्याग करण्यात समाधान वाटल्यामुळे किंवा त्या व्यक्तीला दुखावणं स्वतःला दुःखकारक वाटल्यामुळं वेगळं वागू शकते. हा सगळा शक्तीचा मामला असतो.

नयनाः त्याच तथाकथित, परंपरागत शक्तीवर हल्ले करून तिला कमकुवत करता येतं. म्हणूनच अन्यायग्रस्तांना न्याय मिळण्यासाठी प्रयत्न करता येतो.

रवींद्रः तेच. म्हणजे शक्तीच ! शक्ती वाढली की न्याय मिळतो. तुझ्या डायरीत पाहिजे तर लिहून घे -- समानता म्हणजे अन्याय करण्याची समान कुवत ! -- जी कधीच नसते.

नयनाः तू म्हणतोस, काही नव्हतंच तसं. मागं अपराधी भाव राहावे असं काहीच नव्हतं ! जे काय घडलं ते आपल्या दोघांतच असल्यामुळं तू असं म्हटल्यावर प्रश्नच मिटतो. मी दुसरं काही म्हटलं तर तो गळेपडूपणा होईल. तुझा स्वभाव कदाचित न गूंतणारा होता, माझा गुंतणारा होता. गुंतणाऱ्या स्वभावाचे लोक निष्ठा,प्रेम वगैरे शब्द वापरतात. तुझ्यासारख्यांना त्या शब्दांची गरज पडत नाही. गुंतणारं मन जखमी होतं, तळमळत राहतं. त्याचं सगळंच असं खोलवर असतं की दुसरी कुठली शक्यता त्याला सहनच होऊ शकत नाही. पण याला न गुंतणाऱ्या मनाच्या माणसाचा काय
इलाज ? त्याला तर त्याच्या स्वतःच्या मनानंच जगावं लागणार. तो काही मारूनमुटकून गुंतून राहू शकणार नाही. मग माझ्यासारखीच्या एखादीच्या आयुष्याला वेगळीच कलाटणी मिळाली तर त्याला काय करणार ? ती काही त्या परिस्थितीची किंवा त्या व्यक्तीची मागणी नसते. ते माझंच मन असतं. मलाही माझ्याच मनानं जगणं भाग असतं. त्यामुळं मग त्याला नशीब म्हणायचं. पण तरीसुध्दा मनात एक प्रश्न येतोच की असं का केलंस तू ? असा का वागलास ?

रवींद्रः ' असा का वागलास ' असं म्हणण्यासारखं मी काही केलंय असं मला वाटत नाही. त्यावेळी एक आपुलकी, आकर्षण होतं हे खरं आहे, पण मुळातच एका व्यक्तीत खोलवर गुंतून पडणारं माझं मन नाही. तरीही तुझ्या अपेक्षप्रमाणे वागणं होऊ शकलं असतं माझ्याकडून. तुझ्याशी लग्न केलं असतं तरी काही बिघडलं असतं असं नाही. पण माझ्या काही गरजा होत्या. आर्थिक अडचणी होत्या. त्याही सोडवल्या जाण्याची इथं शक्यता होती. वनिताही काही वाईट नाही. माझ्या दृष्टीनं ठीकच आहे. आणि त्या माझ्या गरजा तुला सांगणं योग्य नव्हतं. आणि तुम्हाला ते शक्यही झालं नसतं हे मला माहीत होतं. यात मला फारसा अपराधीपणाही वाटत नसल्यानं संपूर्ण आयुष्यावर याची सावली पडण्याचा धोका नव्हता. मी काही फार मोठी प्रतारणा वगैरे करतोय असं मला वाटलं नाही. आई-वडिलांच्या आजारपणात मला कर्जही झालं होतं. इथं आल्यावर तुला ते कळलेलंच आहे. आणि हा निर्णय घेताना माझ्या मनात वैचारिक घर्षण झालंच नाही असं नाही. आणि एकदा वैचारिक घर्षण झालं की त्याचा निर्णय अमुकच होईल आणि तो योग्यच असेल असं काही सांगता येत नाही. आणि हे सगळ्यांच्याच बाबतीत खरं असतं.

नयनाः आणि तरीही लपवालपवीची गरज वाटतेय तुला. माझी आणि तुझी पूर्वीची ओळख असल्याचं दाखवणं तू टाळलेलं आहेस.

रवींद्रः ते दुसऱ्यांना शंकाकुशंका नकोत म्हणून !

नयनाः माझ्यासमोरही तुला काही अपराधीपणा वाटत नाही ?

रवींद्रः ते आता गुंतून पडण्याच्या तुझ्या स्वभावामुळं वाटतं. तू समोर नसलीस तर माझं मला अपराधी वाटायचं काही कारण नाही. आणि एरवीसुध्दा'-- कधीही -- आपल्या मनात अपराधी भाव हा दुसऱ्या कुणामुळं तरी निर्माण होत असतो. त्या दुसऱ्याला आपण फार महत्त्व देत असलो तर !

नयनाः म्हणजे माझं महत्त्व आहे-हे कळून बरं वाटलं ! आणि दुसऱ्यांना उगीच शंकाकुशंका नकोत याची तू काळजी घेतोस म्हणजे त्यांना महत्त्व आहे - हेही पाहून बरं वाटलं ! तूही बांधलेलाच आहेस शेवटी !

रवींद्रः बांधलेला वगैरे काही नाही, पण कुठलीतरी चौकट नीट ठेवावी लागतेच प्रत्येकाला-- निर्गुण, निराकार तर आपण नाही --

नयनाः पण मी म्हणते -- ( बेल वाजते. रवींद्र जाऊन दार उघडतो. योगनी येते. )

रवींद्रः उशीर झाला ?

योगिनीः एक जुनी मैत्रिण भेटली. चहा,गप्पांत जरा वेळ गेला.( बसते.) काय डायरीत काही नोंदी होतायत की नाही ?

नयनाः डायरीत होतायत. मनात होतायत. आणि नोंदी करण्याइतकंच त्या घालवता येणंही महत्त्वाचं आहे हेही लक्षात यायला लागलंय.

रवींद्रः तुम्ही तुमचा तो पर्सनल मामला बघा. फार तर नंतर तो सामाजिक मामला होईल. पण तो काही सगळ्यांचा पर्सनल मामला नाही. म्हणजे कोण कशाकडं कसं बघतं हा।

योगिनीः ए, असं काय तोडतोयस तिला ? तू याच्या बोलण्याकडे जास्त लक्ष नको देऊस. तुला याची माहिती नसल्यानं विचित्र वाटेल तुला.

नयनाः माहिती असती तरी विचित्र वाटलं असतं !

रवींद्रः म्हणजे कुणाला माझी माहिती असो - नसो, मी विचित्र आहे हे नक्की केलंत तुम्ही । चांगली आहे स्त्रीसमता ! पुरुषावर शिक्का मारून मोकळे !

योगिनीः कलाटणीबहाद्दर आहेस नुसता तू !

नयनाः मी आता आपल्याला चहा करून आणते.

योगिनीः अग, करू, थांब जरा.

नयनाः बस तू -- ( जाते. )

रवींद्रः कुमारी नयना शारंगपाणी !

योगिनीः काय विशेष ?

रवींद्रः कसल्या दगडाच्या नोंदी करणार !

योगिनीः तुझा हा असला निरुत्साहीपणा काही कामाचा नाही. मला नाही आवडत. कशी ती वनिता तुझ्याबरोबर आयुष्य काढणार आहे काही कळत नाही.

रवींद्रः कुणाला तरी माझ्याबरोबर आयुष्य काढावं लागलंच असतं.

( इथे अंधार होतो. पुन्हा प्रकाश पडतो तेव्हा काही दिवस उलटून गेलेले आहेत. समोर वनिता,नयना.)

वनिताः आता योगिनीच्या लग्नावरच लक्ष केंद्रित करता येईल. ते एक ऑपरेशनचं संकट निवारलं गेल्यामुळं आता काही प्रश्न नाही.

नयनाः माणसं छान मिळालीत तिला ! तिच्या मनासारखं होतंय सगळं.

वनिताः रवीला तिचं फार आहे ! हे नीट होण्यात त्याला फार आनंद होईल.

नयनाः खरंच ! त्यांचं बहिणीवरचं प्रेम बघून बघणाऱ्याचं मन भरून येईल !( योगिनी आतून येते.)

वनिताः स्वतःच्या अटींवर नवरा मिळवणारी योगिनी हे एकच उदाहरण मला तरी माहीत आहे.

नयनाः तुला नाही जमलं ?

वनिताः मी तसा प्रयत्नच केला नाही.

नयनाः आता कर प्रयत्न तुझ्या गोष्टी अंमलात आणायचा --

वनिताः एकदा बसलेली रचना पुन्हा मोडतोड करून नवी करायला नको वाटतं गं ! आणि आहे हेही काय वाईट आहे ! रवी माझ्यावर अन्याय करतोय किंवा मला दबावाखाली वागवतोय असं काही मला वाटत नाही.

योगिनीः या कौशल्यातच खरा न्याय असतो ! ( बेल वाजते. योगिनी जाऊन दार उघडते. रवींद्र आत येतो. ती दार लावते. रवींद्र जरा गंभीर. हातातली बॅग ठेवतो. मग बसतो.)

रवींद्रः हं ! काय चाललंय !

योगिनीः तुझे गोडवे गाणं !

रवींद्रः हं --

योगिनीः बास ? एवढंच ? फक्त ' हं S'? अशा वेळी तुझ्याकडून एवढंच अपेक्षित नसतं.

रवींद्रः हं --

योगिनीः म्हणजे गंभीर आहे काहीतरी --

रवींद्रः आहेच तसं गंभीर. याच्या आधी एकदा कानावर आलं होतं. पण मी सोडून दिलं होतं. आज पुन्हा तेच कानावर आलं. फार विचार केला मी. पण आता तुम्हाला न सांगणं अयोग्य होईल. म्हणून सांगायचं ठरवलंय. जो काय असेल निर्णय तो सगळ्यांच्या विचारानं होऊ दे --

योगिनीः काय पण ? कशाबद्दल ?

रवींद्रः नियोजित वर चिरंजीव दिनेश अभ्यंकर याचे दुसऱ्या एका मुलीशी फार जवळचे संबंध असल्याची खात्रीलायक माहिती मिळतेय. पहिल्यांदा मी दुर्लक्ष करायचं ठरवलं होतं. पण पुन्हा तेच समोर आल्यावर -- आणि सांगणारी व्यक्ती माझ्या चांगली विश्वासातली असल्यामुळं - मी गोंधळून गेलोय ! ( सगळे गंभीर होतात. )

वनिताः तुझ्या विश्वासातल्या माणसानं दिलीय ही माहिती ?

रवींद्रः होय.

वनिताः मग योगिनीला का पसंत केलं असेल त्यानं ?आपल्याला तर हे सगळं त्याच्या इच्छेनं चाललेलं दिसतंय !

योगिनीः बरं, आपल्याकडून त्यांचा काही मोठा फायदा आहे असंही नाही !

रवींद्रः ( अचानक चिडून ) काहीतरी फालतू बडबडू नकोस ! ( योगिनी चपापते. गप्प बसते. सगळेच गप्प बसतात.)सॉरी ! सॉरी !

वनिताः तू टेन्शन नको घेऊस ! विचार करू आपण ! वेळ गेलेली नाही !

योगिनीः असं करायला कारण असेल पण काहीतरी ! नाहीतर माझ्याशी लग्न करून तिच्या आठवणी जर येत राहिल्या तर पंचाईत व्हायची ! सारखी तुलना पण येऊ शकते डोक्यात ! किंवा तिला फसवल्याचं दुःख, पश्चात्ताप ! आणि हे काहीच होणार नाही असं कसं होईल !

रवींद्रः ( तिच्याकडे पाहात राहतो.) बरोबर आहे. कारण कळलं पाहिजे.

वनिताः कारण कळलं तरी विचारच करावा लागेल. योगिनी म्हणतेय ते बरोबर आहे. सहज नॉर्मली सामोऱ्या आल्या पाहिजेत दोन व्यक्ती. अशी बॅकग्राऊंड असणं मला तरी पटत नाही.

रवींद्रः आताच्या या गुंतागुंतीच्या जगात इतक्या शुध्द अपेक्षा ठेवणं तरी बरोबर आहे का ?

नयनाः पण उडाणटप्पूपणा तर नाही ना हे तरी पाह्यला हवं. स्वभाव धोक्याचा नसावा. शेवटी आपल्या मुलीच्या दृष्टीनं आपण पाह्यचं !

वनिताः आणि हे कळलंच नसतं तर काय करणार होतो आपण !खुषीतच राहिलो असतो ! असंही म्हणता येईल !

योगिनीः पण कळल्यावर दुर्लक्ष कसं करणार । जाणूनबुजून दुःखाच्या खड्ड्यात उडी कशाला मारायची ? न कळता असं काही घडतही असेल ! पण मग ती फसवणूक म्हणावी लागेल ! आणि फार प्युरिटीची अपेक्षा धरावी असा काळ नसला तरी याचे आपल्या पुढच्या आयुष्यावर काय परिणाम होतील याचा अंदाज तर घ्यावा लागेलच. मुलगा मग फार गुंतून पडणारा, भावनाशील वगैरे असून चालणार नाही. पण म्हणजे बेफिकीर टाईपही असून चालणार नाही.

रवींद्रः मला वाटतं या प्रकरणाची नीट माहिती काढावी आणि मग निर्णय घ्यावा. डायरेक्ट त्या मुलाला तर विचारता येणार नाही. कारण हे किरकोळ असलं तर याला इतकं महत्त्व का दिलं म्हणून तो संतापण्याची शक्यता आहे. आणि महत्त्वाचं असून त्याला ते लपवायचं असलं तर कांगावखोरपणा करून संतापण्याची शक्यता आहे. डायरेक्ट विचारणं धोक्याचं आहे. चालू शकणारी गोष्टही सगळी मोडतोड करायला कारणीभूत होईल ते .

वनिताः आणि सांगोवांगीची माहिती कितपत रिलायबल असेल ? आतलं खरं कुणाला माहीत असणार आहे ?

नयनाः म्हणजे डायरेक्ट मुलालाच विचारणं योग्य ठरणार आहे. ठरलेलं मोडण्याचा धोका असला तरी. मोडण्याचा धोका आहे या भीतीनं मोडण्याच्या लायकीचं असलेलं टिकवण्यात तरी काय अर्थ आहे ? फार फार तर काय होईल ? चालू शकलं असतं असं मोडलं जाईल. पण त्यामुळं सगळं आयुष्य काही अंधारात जाण्याचा धोका नाही. कारण हा ठरवलेला विवाह आहे. योगिनीच्या बाजूनं इतकी काही गुंतागुंत नाही.

योगिनीः हे बरोबर आहे. म्हणजे यात पर्याय दोनच. एकतर डायरेक्ट मुलाला विचारणं किंवा हे आपल्याला काही कळलंच नाही असं धरून पुढं जाणं. दुसरा पर्याय कुणालाच पटत नाहीय. म्हणजे त्याला सरळ विचारणं हेच करावं लागेल.

रवींद्रः आणि मग एकच मुद्दा उरतो. तो संतापण्याची शक्यता खरी झाली तर हे मोडण्याची शक्यता आहे. पण समजा, तसं झालं नाही आणि या गोष्टीच्या समर्थनासाठी काही सांगत बसायचं त्यानं ठरवलं तरी त्याला काय वाटणार - एक तर एवढं डिफेन्सिव्ह राह्यची गरज काय आणि इतकंही करून संशय निवळेल की नाही हे त्याच्या हातात नाहीच. त्यामुळं एकदा विचारलं की आपली भूमिका निर्णायक होणार.हे त्यानं का मान्य करावं ? म्हणजे विचारणं याचा अर्थ मोडणंच ! त्यामुळं याच्याकडे दुर्लक्ष करणं किंवा हे मोडणं हे दोनच पर्याय आहेत.

वनिताः त्याचा असा पास्ट असल्यामुळे थोडंसं डिफेन्सिव्ह राह्यला तो तयारही होऊ शकेल. आपल्या विचाराच्या कक्षेत येणाऱ्या शक्यता या सगळ्या शक्यता आहेत असं समजायचं काही कारण नाही.

रवींद्रः मला ही फार दूरची शक्यता वाटते . आणि शेवटी असं जरी झालं तरी समजूतदारपणाची श्रेष्ठ भूमिका होणार आपली - म्हणजे समर्थन पटलं तर ! हे तरी नॉर्मल थोडंच असणार आहे ! म्हणजे मोडायचं की नाही मोडायचं एवढाच निर्णय घ्यायचाय ! आणि तो बरोबरच असला पाहिजे असा फारसा आग्रह न धरता ! किंवा धोका पत्करून बोलायचं ठरवू !

योगिनीः म्हणजे निर्णय घ्यायची वेळ आली की नॉर्मल काही राहणारच नाही. असा प्रश्न समोर न येताच काय ते व्हायला पाहिजे होतं ! प्रश्न समोर आला म्हणजे बिघडलंच सगळं !

वनिताः खूप गुंतागुंतीची गणितं करून शेवटी दोन न् दोन चार हेच सूत्र येत असेल तर व्यर्थ खटाटोप हवाय कशाला मग ! ठरल्याप्रमाणे - करून टाकावं हेच ठीक होईल मग ! हे झालं एक. पण माझ्या मते एकमेकांवर पूर्ण विश्वास पाहिजे. जी गोष्ट नंतर कळल्यामुळं संबंधात बिघाड होऊ शकेल किंवा दुसऱ्या व्यक्तीला ती फसवणूक किंवा विश्वासघात वाटू शकेल अशी गोष्ट गुप्त ठेवू नये असं मला वाटतं. असं होत असेल तर तो दुसऱ्या व्यक्तीवर अन्याय आहे. त्यामुळं होकारार्थी निर्णय घेताना नीट विचारच केला पाहिजे असं मला वाटतं. एकाच गणितानं दोन्ही उत्तरं येऊ शकतात.

नयनाः म्हणजे ही गणितं येणाऱ्यांचं जगणं आणि न येणाऱ्यांचं जगणं यात फारसा काही फरक नाही. सगळं अज्ञान आणि जुगारच आहे. बरोबर काय हे जर नेमकं शोधताच येत नसेल तर आयुष्य म्हणजे एक जुलूमच म्हणावा लागेल.

रवींद्रः ( खरं म्हणजे नयनाला उद्देशून, पण तसं न दाखवता ) म्हणूनच मी म्हणतो की कुणाला चांगलं, वाईट, बरोबर, चूक म्हणण्यात काही अर्थ नसतो. पण तसं काही म्हणण्याशिवाय गत्यंतर नसतं इतकंच ! कारण आपली कोणतीतरी भूमिका ही असतेच ! गोंधळलेली असली तरी !

वनिताः योगिनी, मग आता नाणेफेक कर बाई तू ! नाहीतर, त्याचे दुसऱ्या मुलीशी संबंध आहेत हे कळल्यावर तुझी प्रतिक्रिया काय येतेय ते सांगून टाक ! तोच आपला निर्णय !

नयनाः रवींद्र, मला राहवत नाही म्हणून विचारते. रागावणार नसलात तर --

रवींद्रः विचारा --

नयनाः तुम्हाला तुमची बाजू सुरक्षित ठेवायचीय की तुमच्या बहिणीच्या भवितव्याचाही विचार करायचाय ?

रवींद्रः तो विचार करतानाच कळतंय ना आपल्याला की, हे फक्त आपल्या कल्पनेनंच ठरणार म्हणून !

नयनाः होय, पण तरीही काहीतरी भूमिका असणारच ना ! ' गोंधळलेली ' असली तरी ! ती तुमची भूमिका का नाही सांगत तुम्ही ?

रवींद्रः निर्णय योगिनीनं घ्यायचाय शेवटी !

नयनाः हो, पण त्यासाठी तिला आपली सगळ्यांची मदत हवी असली तर ?

रवींद्रः अर्थात, मदत करणारच !

नयनाः ( काही क्षणांनी- ) माझ्या माहितीत एक अगदी असंच उदाहरण आहे. त्याचा काही उपयोग होईल का निर्णय घ्यायला ?

रवींद्रः उदाहरण हे ' अगदी असंच ' असतं ! हेच नसतं ! फार वेगळं असतं ते ! माणसं, घटना, परिस्थिती सगळं वेगळंच असतं !

नयनाः हो, पण भूमिका या अनुभवातूनच ठरतात. अनुभवाशिवाय भूमिका असते का कधी ?

रवींद्रः म्हणूनच भूमिकेत काही तथ्य नाही हे लक्षात आलं तर अनुभवातही काही तथ्य नाही -- असंच होतं ते !

नयनाः पण कृती करावी लागणार नं ! कशी का असे ना ! त्या कृतीला चुकीचा का पाया असे ना, तो तयार करायला मदत करायला हवी असं म्हणतेय मी.

रवींद्रः ते ठरलंच आहे. कृतीचे पर्याय दोन. एक तर आपला आपण निर्णय घेऊन मोकळं व्हायचं. नाहीतर दुसरा -- त्याच्याशी बोलायचं ! आपलं आपल्यात ठरू शकतंय का बघायला आपण दोन दिवस थांबू शकतो. नाही जमलं तर दुसरा पर्याय, बोलायचं.

योगिनीः कुणी ?

रवींद्रः मी बोलेन.

योगिनीः एकट्यानं की माझ्या उपस्थितीत ?

रवींद्रः त्याच्या दृष्टीनं विचार केला तर एकट्यानं बोलणं बरं होईल. पण तुझ्या दृष्टीनं विचार केला तर तुझ्या उपस्थितीत बोलणं चांगलं होईल ! दोन्ही गोष्टींचे वेगवेगळे चांगले - वाईट परिणाम असतील.

योगिनीः मला वाटतं, आता मदत म्हणजे अशी होऊ शकेल. निरनिराळे निर्णय निरनिराळ्या पध्दतींनी घेऊन माझं आयुष्य कसं जाईल याचा तपशीलवार विचार आपण प्रत्येकानं आपापल्या कल्पनाशक्तीनं करायचा आणि त्यातलं काय बरं वाटतंय हे फक्त सांगायचं !

रवींद्रः नाहीतरी, निर्णयात मदत म्हणजे अशीच होणार ! म्हणूनच माझं म्हणणं नाणेफेक करण्यापेक्षा आपण एकेका शब्दात आपला निर्णय सांगू आणि लोकशाही पध्दतीनं त्यातला अधिक प्रभावी निर्णय घेऊ. म्हणजे असं -- ' मोडायचं', 'ठेवायचं ' आणि ' बोलायचं ' -- यांपैकी एक शब्द प्रत्येकानं सांगायचा. मी सांगतो -- ठेवायचं.

वनिताः मोडायचं.

योगिनीः बोलायचं.

नयनाः नाही, नाही. आता माझं मत निर्णयक होईल. असं नको.

योगिनीः आता असं नाही. सांगावंच लागेल.

नयनाः बरं, मग -- बोलायचं !

रवींद्रः ठीक आहे. सध्या निर्णय पेंडिंग ठेवण्याकडे लोकशाहीचा कल आहे. तसं चालू दे ! कारण आत्ताच्या आत्ता
काही बोलता येणार नाहीय. फोन करून ठरवून जावं लागेल. तोपर्यंत आपल्यालाही वेळ मिळेल. खरंच, लोकशाहीइतका मुत्सदी प्रकार कुठं नसेल !

योगीनीः या निर्णयानं आत्ता तरी मला रिलीफ वाटतोय !

नयनाः ठीक आहे. सध्या तरी हे सगळं झालेलं आहे. आता माझ्या माहितीतलं जे उदाहरण मी मघाशी सांगणार होते ते सांगते. माझ्या माहितीत एक मुलगी आहे. ( रविंद्र तटस्थ.) तिचं एका मुलावर मनापासून प्रेम होतं. वर्षभर चाललं होतं. चुंबनं, आलिंगनं, लग्नाची शपथही झाली होती. पण अचानक त्यानं दुसऱ्या मुलीशी लग्न करून टाकलं. जिच्याशी लग्न केलं तिला हे काही माहीत नाही. अजूनही माहीत नाही. त्या मुलीनं फारच खोलवर -- मनापासून प्रेम केलं होतं. दुसरीकडे संबंध जुळवणं तिला अजूनही जमलेलं नाही. नंतर त्यांची भेट झाली. त्याचं म्हणणं इतकं विशेष काही नव्हतंच त्यांच्यात. शिवाय त्यानं काही पटण्यासारखी आर्थिक वगैरे कारणं सांगितली. तरी तिला एक खटकतच राहिलं की, यानं आपला विचार केला नाही. आपल्या मनाची याला कल्पना नाही. आणि कितीही म्हटलं तरी त्यालाही याचं दडपण येतच असणार असं मला वाटतं. पण त्याच्या पत्नीला हे काही माहीत नाही. त्यामुळं एखादी ॲब्नॉर्मल गोष्ट तिला जाणवली तरी ती दुसऱ्या कुठल्यातरी कारणानं असेल, असं ती समजणार.

योगिनीः म्हणूनच अती प्रेम वाईटच ! माझं तसं काही नाही !

वनिताः दोघींनाही फसवलंन म्हणजे त्यानं.

योगिनीः पण पत्नीला फसवलेलंही माहीत नसल्यावर काय प्रश्न येतोय !

वनिताः रवीनं हे काहीच सांगितलं नसतं तर आपल्यालाही काही प्रश्न आला नसता !

रवींद्रः पण मी गोंधळलेला होतो. याची जबाबदारी मी एकट्यानं घेणं अयोग्य वाटलं मला.

नयनाः माणूस स्वतःचे निर्णय बेधडकपणे घेत असतो. पण आपल्याला आपुलकी वाटणाऱ्या दुसऱ्या माणसांचे निर्णय घ्यायला घाबरतो.

योगिनीः पण त्याचा असा बेफिकीर, स्वार्थी ॲप्रोच पाहिल्यावर तरी त्या मुलीच्या डोक्यात प्रकाश पडला की नाही ?

नयनाः तिच्या मनाची आणि स्वभावाची ती गुलाम असल्यामुळं याचा तिला काही उपयोग झाला नाही.

वनिताः दुर्दैवी बिचारी !

योगिनीः मी तर म्हणते, झालंच आहे ना आता असं, तिनं सूड घ्यावा त्याचा.

नयनाः ती एकतर गप्प बसून सहन करेल किंवा सूड घेईल. पण काहीही केलं तरी त्रासच होईल तिला.

योगिनीः पण त्याला धडा शिकवल्याचं समाधान तरी मिळेल !

वनिताः आणि त्याच धड्याचा दणका त्याच्या निर्दोष पत्नीला बसला तर ?

योगिनीः त्याला ती मुलगी काय करणार ? ती तिच्या फसवणूक करणाऱ्या नवऱ्याची जबाबदारी ! त्याच्यामुळंच घडणार नं हे !

नयनाः ( रवींद्रला ) तुमचं काय म्हणणं ? तिनं काय करावं ?

रवींद्रः तो तिचा प्रश्न आहे ! ( उठतो आणि जातो.)

योगिनीः मी तिच्या जागी असूच शकले नसते म्हणा कारण माझा स्वभाव वेगळा आहे. नाहीतर मी काय केलं असतं ते मी सांगू शकले असते.

( वनिता आणि नयना स्मित करतात. अंधार होत होत पडदा पडत जातो....)

अंक पहिला समाप्त

## अंक दुसरा

(पडदा उघडतो तेव्हा समोर नयना आणि वनिता. वेळ संध्याकाळची. )

नयनाः आज ठरल्याप्रमाणे रवींद्र, दिनेश अभ्यंकरांशी बोलून येईल.

वनिताः कसं काय पार पडतंय संभाषण कोण जाणे ! रवीच्या बोलण्यानं ते दुखावले नाहीत म्हणजे बरं -- नाहीतर प्रॉब्लेम विशेष महत्त्वाचा नसूनही बोलण्यामुळं महत्त्वाचा ठरायचा।

नयनाः पण काय आहे ते स्वच्छपणानं निदान कळलं तरी पाहिजे. महत्त्वाचे तपशील माहीत नसताना विचार करणंही मूर्खसारखं वाटतं.

वनिताः आपण सद्‌हेतूनं वागू शकतो, पण काय व्हावं हे आपल्याला नाही ठरवता येत. अनेक गोष्टींवर अवलंबून असतं ते !

नयनाः कालपासून माझ्या डोक्यात वेगळेच विचार चालू आहेत. त्यातही माझी गंमतशीर इच्छा काय आहे माहीत आहे ?

वनिताः काय ?

नयनाः माझ्यापुढे प्रश्न असा आहे की, तो प्रश्न तुला सांगायच्या आधीच त्यावर मी काय करावं याबद्दल तुझा -- आणि फक्त तुझाच -- सल्ला मला मिळणं आवश्यक आहे.

वनिताः काय प्रश्न आहे ते सांगितल्याशिवाय मी कसं काही बोलू शकेन त्यावर ?

नयनाः मी हे तुला बोलावं की नाही याबद्दल हवाय मला तुझा सल्ला ! पण हा सल्ला विचारायचा झाला तर आधीच बोललं जाणार ते !

वनिताः कोड्यात बोलू नकोस.

नयनाः कारण हा सल्ला मी दुसऱ्या कुणाचा घेऊ शकत नाही. दुसऱ्या कुणाला हे कळावं अशी माझी इच्छा नाही. जे गुप्त आहे ते गुप्तच राहिलं पाहिजे आणि ते तुझ्याशी संबंधित आहे. एका चांगल्या गोष्टीसाठी मला ते बोलणं आवश्यक आहे, पण त्याचबरोबर काही त्रासदायकही घडू शकेल. माझ्या दृष्टीनं तो एक नैतिक प्रश्न आहे. पण तुझ्या इच्छेशिवाय तुझ्या आयुष्याला स्पर्श करायची

माझी इच्छा नाही.

वनिताः अशक्य आहे. तुझ्या बोलण्यानं किंवा न बोलण्यानं माझ्या आयुष्यावर वेगवेगळे परिणाम होणार आहेत, तर तू बोलल्याचे परिणाम मला चालतील, की न बोलण्याचे हे मी तुला आधी कसं सांगणार ? तू मला अशी संधी देऊ इच्छितेस यावरून तुझं माझ्यावरचं प्रेम दिसून येतं. पण प्रत्यक्षात तू ती संधी देऊ शकत नाहीस. म्हणजे याचा निर्णय तुझा तूच घेतला पाहिजेस. तूच साधकबाधक विचार करून योग्य काय ते ठरवून वागलं पाहिजेस. नंतर काय होईल त्याला नंतरच तोंड देता येईल. पण मला एक कळत नाही की, असं काय असणार आहे बोलण्यासारखं तुझ्याकडे ? इतकं महत्त्वाचं ठरावं माझ्या आयुष्यात असं ?

नयनाः योगिनीच्या दृष्टीनं ते बोलणं आवश्यक आहे असं मला वाटतं. पण तिला यातलं काही कळता कामा नये. हे फक्त तुझ्या--माझ्यात राहिलं पाहिजे. तुझ्या दृष्टीनंही ते बोलणं काही कारणांनी योग्यच वाटतं मला.पण कदाचित नंतर तू असंही म्हणू शकशील की हे बोलायची काय गरज होती ? खरं असलं तरी ?

वनिताः जाऊ दे ! बोलून टाक !

नयनाः माझ्यापुढचा हा एक नैतिक प्रश्न आहे. आणि हा का मला तीव्र वाटतो माहितीय ? दुसऱ्या एका व्यक्तीच्या मनात असाच एक नैतिक संघर्ष होण्याची मला शक्यता वाटते. आणि स्वतःची बाजू स्वःलाच पटवण्यासाठी आणि टिकवण्यासाठी व्यक्ती चुकीचा निर्णय घेऊ शकते. असा निर्णय घेतला गेला तर तो योगिनीला त्रासदायक होईल अशी मला भीती वाटते. आणि मला काही गोष्टी लक्षात येत असून मी गप्प बसावं का असा माझ्यापुढे प्रश्न आहे.

वनिताः सांगितलं ना ! जे तुझ्या मनात असेल ते सगळं सांग -- नंतर माझं काहीही मत झालं त्याबद्दल तरी मी तुला दोष देणार नाही.

नयनाः तू धक्काबिक्का बसून घ्यायचा नाहीस किंवा त्रास करून घ्यायचा नाहीस. मी सांगतेय ते ऐक. मी काल बोलताना एका मुलीचं उदाहरण दिले होतं. आठवतंय ?

वनिताः हं --

नयनाः ते माझं स्वतःचं होतं.

वनिताः म्हणजे, तू अशी फसवली गेलीयस ?

नयनाः हो, फसवलं हा शब्द आपण फक्त माझ्या दृष्टीनं वापरतोय. पण माझ्याशी असलेले संबंध तोडणारी व्यक्ती कोण होती --

वनिताः हं ? --

नयनाःः रवींद्र --! ( वनिता दचकून पाहते. )

वनिताः पण --

नयनाः मी तर नवीनच आलेय इथं -- माझी आणि त्याची पूर्वीची ओळख असल्याचं तुम्हाला दिसलं नाही -- अशा तुझ्या शंका असणार. ऐक. दिसलं नाही कारण दाखवलं नाही -- तुम्ही नसताना आमचं याबद्दल बोलणंही झालेलं आहे ---

वनिताः म्हणजे तुझ्याशी त्याचे लग्नापूर्वी प्रेमाचे संबंध होते. तुला डावलून त्यानं माझ्याशी लग्न केलं. आणि तू एक अनोळखी स्त्री असल्याचं तो दाखवतोय ते एक ढोंग आहे ?

नयनाः होय. पण मी तुला आधीच सांगितलंय की हे फक्त तुझ्या--माझ्यातच राहिलं पाहिजे. आता योगायोगानं तसाच प्रश्न योगिनीच्या नियोजित पतीच्या बाबतीत समोर आलेला आहे. रवींद्रनं असं केल्यामुळं त्याच्या मनात याचं काही दडपण राहिलं की नाही आणि त्याचा तुमच्या मानसिक जीवनावर काही परिणाम झाला की नाही ते मला माहीत नाही. पण योगिनीचा नियोजित पती असलेल्या दिनेशचा स्वभाव रवींद्रसारखाच असेल की नाही माहिती नाही. वेगळा असण्याचीच शक्यता जास्त. त्यामुळं असं काही असेल तर योगिनीच्या जीवनावर त्याची सावली पडणारच नाही असं गृहीत धरता येणार नाही.

वनिताः बरं मग ?

नयनाः आज त्यांचं बोलणं होणार आहे. रात्री आपली चर्चा होऊन निर्णय होईल. त्याआधी मला हे सगळं तुला सांगायचं होतं !

वनिताः त्यामुळं काय होईल ?

नयनाः तुला कालच्या बोलण्यात एक दिसून आलं असेल की रवीचा कल --सॉरी, मी त्याला रवीच म्हणत होते -- तर रवीचा कल या गोष्टीकडे दुर्लक्ष करावं अशा मताकडे होण्याची शक्यता दिसते. याचा मी विचार केला. कळत-नकळत त्याच्या मनातही हा एक नैतिक प्रश्न असणार आहे. जी गोष्ट त्यानं स्वतः सहजपणे केली तशाच बाबतीत दुसऱ्याला दोषी ठरवणं त्याला कठीण जाणार आहे, असं मला वाटलं. त्याच्या या प्रॉब्लेममुळे योगिनीचं नुकसान होऊ नये असं वाटत असेल तर मला तुझ्याजवळ हे उघड करणं भाग होतं, म्हणजे तू यात योग्य भूमिका बजावू शकशील. तुझ्या बाबतीत, फक्त नसलेली माहिती मिळाल्यामुळं काही त्रास होण्याची शक्यता गृहीत धरली तरी योगिनी अजून त्या प्रॉब्लेममध्ये पडण्यापासून वाचू शकते याला महत्त्व देणंही मला योग्य वाटलं.

वनिताः का ? रवी विसंगत वागून बहिणीच्या बाबतीत योग्य वागू शकत नाही ?

नयनाः दोन्ही बाजूंनी त्याला पेच असल्यामुळं सांगता येत नाही. आणि असा पेच येतो तेव्हा तो स्वतःला सोयीस्कर निर्णय घेऊन मोकळा होतो आणि दुसऱ्यांचा फारसा विचार करत नाही असं दिसून आलेलं आहे-- माझ्या बाबतीत. त्यामुळं यातलं योगिनीला काही न बोलता फक्त तुला सावध करावं असं मला वाटत होतं. आणि समजा, तू म्हणतेस तशी जरी त्याच्या विसंगत वागून योग्य निर्णय घेण्याची शक्यता लक्षात घेतली तरी तसंच होईल असं आत्ता म्हणता येत नाही. त्यामुळं तू या बाबतीत सावध असायलाच हवं असाच माझा विचार झाला.

वनिताः आलं लक्षात. त्याच्या मनातल्या नैतिक प्रश्नामुळं तो गोंधळलेला आहे आणि त्यामुळं तो चुकीचा निर्णय घेऊ शकेल असं तुझं म्हणणं. आणि ऐन चर्चेच्या वेळी तू याच्यात फार महत्त्वाची भूमिका घ्यायचा प्रयत्न करणंही योग्य होणार नाही. म्हणून तू मला सावध केलंस यात काही चूक नाही. मी अर्थातच त्याची आता काळजी घेईन. पण रवी माझ्यापासून असं काही लपवून ठेवत असेल असं मात्र माझ्या लक्षात आलं नव्हतं. याचा अर्थ तो माझ्या कल्पनेपेक्षा फारच जास्त कॅल्क्युलेटेड वागू शकतो. याचा अर्थात मला धक्का बसलेला आहेच.

नयनाः पण हे फक्त आपल्या दोघींतच राहील हे तू कबूल केलेलं आहेस. या विषयावर तू त्याच्याशी काहीच बोलायचं नाहीस.

वनिताः असं करायचं झालं तर मला वाटतं तू फार मोठी जबाबदारी घेतेयस. आपापल्या मनांचा गोंधळ क्लिअर न करता, आमच्यात सरळ विचारांची देवाण-घेवाण न होता या बाबतीत निर्णय घ्यावा असा तुझ्या म्हणण्याचा अर्थ होतो. मग ही सगळीच तुझी जबाबदारी राहील. एवढी जबाबदारी तू का घ्यावीस ? आणि मी का तुला घेऊ द्यावी ? ( नयना विचारात पडते.)

नयनाः ( काही क्षणांनी ) बरोबर आहे तुझं म्हणणं. पण ही तुम्हा दोघांमध्ये कदाचित संघर्ष निर्माण करणारी गोष्ट असल्यामुळं, हे सगळं थोडक्या वेळात नीट होऊन जबाबदार विचारविनिमय तुम्ही करू शकाल का याबद्दल मला शंका आहे. ( वनिताही विचारात पडते.)

वनिताः हे तर अवघडच आहे. मग याच्यावर उपाय ?

नयनाः म्हणजे तुमच्यात विचारविनिमय न होताही तो झाल्याचे रिझल्टस् मिळाले पाहिजेत.

वनिताः हं.

नयनाः कारण - नाही - इतकी जबाबदारी मी काही घेऊ इच्छित नाही !

वनिताः बरोबर आहे. ( काही क्षण रिकामे. )

नयनाः हं, एक उपाय सुचतोय मला. योगिनी आली की तू तिला काहीतरी निमित्तानं बाहेर पाठव. रवी आल्यानंतर तू एक दहा-पंधरा मिनिटं पडते म्हणून, विश्रांतीची गरज आहे म्हणून आत जा. मी रवीशी या विषयावर बोलते, ते तू दाराआडून ऐक. त्यामुळं या एकूण प्रकाराकडे तो कसा पाहतो ते तुला कळेल. त्यावरून या योगिनीच्या निर्णयात तू योग्य भूमिका--म्हणजे तुला वाटते तशी योग्य भूमिका घेऊ शकशील. तुझ्यात आणि रवीत नंतर जे रंगतदार संभाषण होणं आवश्यक आहे -- म्हणजे माझ्या बाबतीतलं -- ते तुम्ही सावकाशीनं नंतर करू शकता. सध्या, त्याचे न् माझे संबंध होते हे तुला माहीत नसणं जे चालू आहे ते तसंच चालू ठेव. त्यात काही फरक पाडायचा नाही. म्हणजे त्याच्या स्वतःच्या भूतकाळातल्या वागण्याचा कितपत परिणाम शिल्लक आहे याचा अंदाज तुला आल्यामुळं योगिनीच्या बाबतीत तरी नीट निर्णय होईल.

वनिताः हं. हे ठीक आहे. अशा पध्दतीनं जास्तीत जास्त साध्य होईल. आणि तुझ्याशी बोलताना थोडीतरी अपराधीपणाची भावना त्याच्यात आहे की नाही हेही पाहण्याची माझी इच्छा आहे. शिवाय तो फक्त तुझ्याशीच बोलत असल्यामुळं वेगळी पोझ घ्यायची त्याला गरज वाटणार नाही. खुल्लम् खुल्ला कळून येईल. हीच गोष्ट आमच्यासमोर बोलताना त्याला वेगळी पोझ घ्यावी लागेल.

नयनाः अगदी बरोबर.

वनिताः पण योगिनीच्या प्रॉब्लेमबद्दल तुझ्याशी बोलताना तो पोझ घेऊ शकेल.

नयनाः तसा त्याचा खोटेपणा टिकू द्यायचा नाही ही माझी जबाबदारी. आमचं संभाषण तू ऐकणारच आहेस.

वनिताः ( काही क्षणांनी ) असं असूनही त्यानं तुला घरात प्रवेश दिला हे विशेषच आहे !

नयनाः त्यात काही विशेष नाही. ते सगळं नंतर सविस्तर बोलू आपण. फक्त त्याला मी काही खास प्रश्न विचारावे असं तुला काही सुचत असलं तर सांगून ठेव --

( अंधार होत जातो. काही क्षण अंधार. पुन्हा प्रकाश पडतो तेव्हा समोर नयना, वनिता आणि रवींद्र बसलेले. रवींद्र नुकताच आलेला.)

वनिताः ( थकवा दाखवत उठते --) रवी, तुझं काय बोलणं झालं वगैरे आपण योगिनी आल्यावर बोलू. येईलच ती

एवढ्यात. तोपर्यंत पाच- दहा मिनिटं पडते मी जरा. अगदी थकल्यासारखं झालंय !

रवींद्रः काही होत नाहीय ना तुला ?

वनिताः अरे, काही नाही. साधा थकवा आहे. पडते जरा एक दहा मिनिटं. शिवाय आज जागावंही लागेल कदाचित.

रवींद्रः ठीक आहे. पड तू. आणि तसं काळजीचं काही वाटत नाही मला. ते बोलू आपण नंतर.

वनिताः हं -- ( जाते.)

रवींद्रः ( काही क्षण जाऊ देऊन --) काल तुला ते उदाहरण द्यायची काय गरज होती ? तू इथं नवीन काही कॉम्प्लिकेशन्स तयार करणार नाहीस असा मी तुझ्यावर विश्वास टाकलेला आहे हे लक्षात ठेव. उगीचच संशयास्पद वातावरण तयार व्हायला नकोय.

नयनाः का ? अप्रस्तुत होतं का ते ?

रवींद्रः पण मागं घडून गेलेल्या गोष्टींची सावली आताच्या गोष्टींवर पाडायचं कारण काय ? आणि या बाबतीत उघड बोलायचा वगैरे तुझा विचार असला तर डोक्यातून काढून टाक. तसं काही केलंस तर ते तुझ्याच गळ्यात येईल. स्वतःची इमेज खराब करून घेशील. मला खरचटणारसुध्दा नाही.

नयनाः तू उगीचच घाबरतोयस. असं कसं करीन मी ! तू काय विश्वासानं माझ्या इथं राहण्याला मान्यता दिली आहेस हे समजत नाही का मला ! आणि आता जे झालं ते झालं ! मी जखमी झाले ! ठीक आहे. पण आता दुसऱ्या एका स्त्रीच्या आयुष्यात दुःख कालवून मला काय मिळणार आहे ? सूड घ्यायचा झाला तर तो फक्त तुझा घेतला गेला पाहिजे. तिसऱ्या व्यक्तीला दुःखी करून नव्हे. वनिताबद्दल माझ्या मनात अतिशय प्रेम आहे. त्यामुळं मी असं काही करेन अशी शंकासुध्दा मनात आणू नकोस.

रवींद्रः ते मी ओळखून आहे म्हणा !

नयनाः तू काही भोळा नाहीस ! एखाद्या स्त्रीच्या जाळ्यात सापडायला ! ( क्षणभर थांबून ) पण त्याची गरजच काय ? तू स्वतःच्याच जाळ्यात पूर्णपणे अडकलेला आहेस असं माझं म्हणणं आहे.

रवींद्रः काहीतरी बडबडू नकोस.

नयनाः म्हणजे तू स्वतःच्याच एका पेचात अडकलायस हे तुझ्या लक्षात आलेलं नाही ?

रवींद्रः कसला पेच ?

नयनाः दुर्दैवानं आणि एका नाट्यमय योगायोगानं दिनेश अभ्यंकर -- योगिनीचा नियोजित पती -- तेच करतोय की जे तू माझ्या बाबतीत केलंस !

रवींद्रः तो त्याचा पेच होऊ शकेल. आणि त्याचाही तो पेचबीच काही नाहीय. मी बोलून आलोय !

नयनाः त्याचा असो नसो, तुझा आहे ! तुझ्या नैतिक समाधानासाठी तुला ते चालवून घेणं भाग आहे. आणि जर बहिणीच्या हितासाठी ते चालूवन घ्यायचं नाही असं तू ठरवलंस तर तुझ्यातले अपराधी

भाव गडद होतील ! तू काहीही केलंस तरी या ना त्या प्रकारे चुकणार आहे !

रवींद्रः हा पेच !

नयनाः जाणीवपूर्वक तुझ्या लक्षात आलं नसेल, पण या प्रश्नातून सध्या तू जातोयस !

रवींद्रः मुळात मला अपराधीपणा वाटावा असं इतकं काही नव्हतंय आपल्यात --

नयनाः चुंबनं, आलिंगनं, लग्न करण्याच्या शपथा हे सगळं 'असं इतकं' काही नव्हतंच म्हणजे !

रवींद्रः तू म्हणतेयस हे असं होतं म्हणून ! मी म्हणतो हे काहीच घडलेलं नाही ! फक्त ओळख होती ! फार तर मैत्री होती ! आणि या असल्या प्रकारात संबंधित दोन व्यक्तींशिवाय तिसरा साक्षीदार असू शकत नाही ! त्यामुळं तुझ्या म्हणण्यात काही तथ्य नाही !

नयनाः ( हळुवारपणे ) रवी, असा कठोर होऊ नकोस. मी तुला दोषही देणार नाही. माझ्या मनाचं काय झालं आणि होईल ते माझं मी सहन करीन. पण हे सगळं खोटं नको म्हणूस ! माझा धोका वाटतो तुला ?

रवींद्रः ( अनावधानानं प्रतिसाद देत) तसं नाही नयना, पण आता जे काय झालेलं आहे त्याला सुसंगत वागावं लागेल मला, हे लक्षात घे ! माझ्याकडून आधीच तू दुखवली गेली आहेस ! तुला आणखी दुःख द्यावं अशी अजिबात माझी इच्छा नाही ! त्या त्या वेळी मी जे वागलो ते वागलो. पण आता वागताना आताची सुरक्षितता बघावी लागेल.

नयनाः ते तू काहीही कर, पण अजूनही मला आपुलकी आहे म्हणून सांगते, या दोन्हीत हळूहळू जास्त तफावत पडू दिलीस तर त्याचं विकृतीत रूपांतर होईल. शक्यतो हे टाळ. मी लौकरच निघून जाईन. पुन्हा मी तुझ्या आयुष्याला स्पर्शही करणार नाही ; पण दोन टोकांत ओढला जात राहू नकोस.

रवींद्रः पण मी दिनेशशी जे बोलून आलोय त्यावरून माझं काहीतरी खरं मत बनेलच की नाही --

नयनाः तेच म्हणतेय मी ! ते 'तुझं' मत असेल. तसाच पास्ट असलेल्या माणसाचं मत ! आणि यावरून तू काही निर्णय घेतलास आणि तो चुकला तर मनात फारच पस्तावत बसावं लागेल तुला !

रवींद्रः एरवीही माझं हेच मत झालं असतं असं मत असेल तर ?

नयनाः असं असू शकेल ? आणि समज, तसं असलं तरी तुला तुझ्या वागण्याचा जो संदर्भ आहे तो पुसून टाकता येईल ? आज निर्णय घेताना यात लिंक नाही असं वाटलं आणि नंतर आहे असं वाटलं तर ?

रवींद्रः हो, पण आत्ता काय वाटतंय ते महत्त्वाचं आहे.

नयनाः आत्ता जे वाटतंय ते का वाटतंय हेही महत्त्वाचं आहे. दुसरं असं की त्यानं तुला काही सांगितलं आणि तुला ते पटलं, जसं, तुझ्या-माझ्यात काही नव्हतंच तसं -- हेही एखाद्याला पटकन पटू शकेल.

रवींद्रः म्हणजे असं काही आहे असं कानावर आलं आणि ते खरं आहे इतपत कळलं तरी ते लग्न मोडणंच इष्ट -- असं तुझं म्हणणं आहे. साधकवाधक विचाराला काही वावच नाही. असं तर जगणंच अशक्य आहे.

नयनाः हे बरोबर आहे. माझं म्हणणं,साधकबाधक विचार करतो म्हणणारा तसा तो करू शकला पाहिजे. नाहीतर त्याच्या पास्टमध्ये दुसरे लोक अडकतील !

रवींद्रः हे तर होतच असतं.

नयनाः पण जिथं त्याचा दुसऱ्याच्या आयुष्यावर महत्त्वाचा परिणाम होण्याची शक्यता आहे तिथं तरी काळजी घेणार की नाही ? तसं तर आपण सगळेच एका खोट्या, न कळणाऱ्या आणि संशयास्पद जगात वावरत असतो आणि तरीही सुरक्षिततेसाठी धडपडत असतो. त्या धडपडीच्या क्षेत्रातच ' बरोबर ' किंवा ' चूक ' हे शब्द असतात. एखाद्याला काही कारणानं ते नाकारावेसे वाटले तरी ।

रवींद्रः मग तुझं म्हणणं काय -- योगिनीच्या लग्नाच्या बाबतीतला हा निर्णय व्हायच्या आत मी अदृश्य व्हावं ?

नयनाः नाही. ते शक्यही नाही.

रवींद्रः मग काहीही असो -- मोडूनच टाकावं !

नयनाः हं -- या पर्यायावर विचार कर.पण मला एक असं वाटतं की वनिताला विश्वासात घेऊन तुझ्या

पास्टमुळं तू यात निर्णय घ्यायला कसा असमर्थ आहेस ते तिला सांगावंस. मग ती त्यातनं काय मार्ग काढेल तो काढेल आणि ठरवेल ते ठरवेल !

रवींद्रः कुणाला काही विश्वासात वगैरे घ्यायची आवश्यकता नाही. तसं काही नाहीच आहे. माझा हा स्टँड मी बदलणार नाही. माझी अशी एक पध्दत राहीलच.

नयनाः तुझी पध्दत !

रवींद्रः प्रत्येकाची असते !

नयनाः हो, पण असा जेव्हा यक्षप्रश्न येतो, आणि तो प्रामाणिकपणे तोंड दिलंच पाहिजे असा असतो, तेव्हा त्या पध्दतीच्या या अशा चिरफळ्या उडतात. आत्ता तुझ्या उडतायत तशा.

रवींद्रः बरं मग मी असं करतो --
( बेल वाजते. क्षणभर थांबतो. दार उघडायला जातो. दार उघडल्यावर योगिनी आत येऊन दार लावते.)

योगिनीः एवढं करून वनिताचं काम झालंच नाही ! आलेच ! काय करतेय ती ?

रवींद्रः काही नाही.पडते म्हणाली जरा.

योगिनीः वनिता ऽऽ ( आत जाते.)

रवींद्रः तर मी म्हणत होतो --

नयनाः आता काही म्हणू नकोस - आता एकत्र बोलताना बघू. मलासुध्दा संशयास्पद वातावरण नकोय ! जे काय असेल ते स्वच्छ असावं !

रवींद्रः म्हणजे ?

नयनाः म्हणजे स्वच्छ असल्यासारखं असावं ! बस्स ? ( एकदोन क्षणांनी योगिनी आणि वनिता बाहेर येतात.)

रवींद्रः ( वनिताला ) झाली विश्रांती ?

वनिताः विश्रांती ? हं -- झाली ! ( बसते. हे सगळं ऐकून तिचा चेहरा जरा बदललेला आहेच. पण ती जास्त दिसू नये याची काळजी घेते.)

योगिनीः खरंच, वनिता, तु थकल्यासारखी दिसतेयस !

वनिताः काही नाही गं ! ठीक आहे !

रवींद्रः बरं, मी दिनेशशी बोलून आलो.( सगळे लक्ष देऊन ऐकतात. ) ठरल्याप्रमाणे तो भेटला. आम्ही एका हॉटेलात बसून बोललो. विषय काढणं अवघड होतं, पण हळूहळू काढला विषय.

योगिनीः तू हुशार आहेस याबद्दल आम्हाला कुणालाही शंका नाही. मुद्याचं बोल !

रवींद्रः तर आपल्याला कळलेली माहिती खरी आहे हे त्यानं कबूल केलं.

योगिनीः मग हे गुप्त ठेवायचं कारण ?

रवींद्रः ऐक तर खरं. त्याचं म्हणणं असं की, त्या दोघांत प्रेमाचे संबंध होते हे खरं आहे. त्यानं अगदी मनापासून तिच्यावर प्रेम केलं. पण तिच्या पायावर आणि पाठीवर कोड होतं, ते तिनं त्याच्यापासून गुप्त ठेवलं होतं. याच्या आईजवळ दुसरी एक बाई हे बोलली. त्यामुळं आईकडून ते याला कळलं. याला राग आला. यानं तिला याबद्दल स्पष्टच विचारलं तर ते खरं असल्याचं तिनं कबूल केलं. तो चिडला. याचा अर्थ ती त्याला फसवू इच्छित होती-- हे त्यानं लक्षात घेतलं आणि तिला आपले संबंध संपले असं स्पष्ट सांगून टाकलं.

वनिताः म्हणजे तिनं ते गुप्त ठेवायला नको होतं -- स्वतःहून सांगायला हवं होतं -- असं याचं म्हणणं ! मग यानं स्वतः ही गोष्ट आपल्यापासून का गुप्त ठेवली ? म्हणजे तोही आपल्याला फसवायला बघतोय असं आपण का समजू नये ?

रवींद्रः मी जरा वेगळा विचार केला होता ; पण बोला तुम्ही.

योगिनी : तू काय केला होतास विचार ?

रवींद्रः नाही, राहू दे --

वनिताः त्याचा वेगळा विचार मला विचार तू ! तसं विशेष काळजीचं काही नाही म्हणत होता तो ! म्हणजे हे पटवून घ्यायला तयार होता !

रवींद्रः नाही, हे खरं आहे, पण मला काय वाटलं की काय चूक आहे, एवढ्या चांगल्या मुलानं का

म्हणून अशी मुलगी करावी ?

वनिताः उद्या याला योगिनीचा एखादा दोष दिसला तर ? मी म्हणते, शारीरिक नाही पण स्वभावाची एखादी ठेवणही सदोष वाटू शकते.

रवींद्रः हे पहा, लग्न करताना सगळेच्या सगळे गुणदोष कळणं शक्यच नाही.

वनिताः पण सांगण्यासारखे ठळक ठळक सोगितले गेले पाहिजेत ना ?

योगिनीः आणि हा ज्याअर्थी ही महत्त्वाची गोष्टसुध्दा आपल्यापासून लपवून ठेवतोय त्याअर्थी तो बनेल असणार आहे. मग हे कोडाचं त्यानं सांगितलेलं तरी खरं असेल कशावरून ? आपण आपलं तेच खरं धरून विचार करतोय. दुसरंच काहीतरी कारणसुध्दा असू शकेल.

नयनाः माणसं एवढी काळाच्या पुढं पाऊल टाकून इतकी समंजस का हेही लक्षात घ्यायला पाहिजे. आपण त्याला उदारपणा आणि समंजसपणा समजतोय.

रवींद्रः मग त्याचं काहीच खरं धरायचं नसेल तर मग बोलून उपयोग काय झाला ?

योगिनीः त्याचा अंदाज घ्यायला काही गोष्टी उपयोगी नाही पडणार ? ( क्षणभरानं) हे गुप्त का ठेवलं म्हणाला ?

रवींद्रः काही नाही. त्यात काही तथ्यच नाही, तर उगीच संशयाचं वातावरण कशाला--असं त्याचं म्हणणं !

वनिताः हेच वाक्य !

रवींद्रः अं ? काय म्हणालीस ?

वनिताः नाही, मी म्हणत होते, हेच ते वाक्य ! उगीच संशय नको असं जे म्हणतात नं त्यांचं नक्की काहीतरी संशयास्पद असतं.

रवींद्रः असं कशावरून म्हणतेस तू ?

वनिताः अनुभव ! मी कशातून बोलणार ? माझ्या अनुभवातून !

रवींद्रः ह्यॅ !

वनिताः 'ह्यॅ ' काय ! मी कसं बोलणार नाहीतर ?

नयनाः तो तुला 'ह्यॅ ' नसेल म्हणाला, तुझ्या मताबद्दल म्हणाला असेल.

वनिताः तू दिनेश अभ्यंकर आहेस असं समज आणि मी तुला प्रश्न विचारते त्यांची उत्तरं दे !

रवींद्रः काय वेडबीड लागलं काय तुला ? हे काय नाटक आहे ?

वनिताः नाही, चाललंय ते सगळं खरं आहे, पण थोडं नाटक केलं तर खऱ्याचं अधिक खरं कळेल !

योगिनीः थांब रे ! बघू तर ! विचार वनिता !

वनिताः माणूस एखादी गोष्ट लपवून ठेवतो तेव्हा ती लपवून ठेवण्यासारखी असते की नाही ?

रवींद्रः असते.

वनिताः आपल्या स्वतःच्या पत्नीपासून अशा गोष्टी लपवून ठेवायला लाज नाही वाटत ? ( आवाज बदलून -- ) म्हणजे होणाऱ्या पत्नीपासून म्हणतोय मी.

रवींद्रः लाज, म्हणजे --

वनिताः ती असंच वागली तर चालेल का ?

रवींद्रः वागतेय की नाही ते तरी मला काय माहीत ?

वनिताः तुमचं मन खात राहिलं, जुन्या आठवणींनी ढगाळ झालं तर त्याच्या तुमच्या पत्नीला होणाऱ्या त्रासाला जबाबदार कोण ?

रवीद्रः आता हे म्हणजे --

वनिताः पत्नी म्हणजे एक मूर्ख बाई वाटते का तुम्हाला ?

रवींद्रः ( नेहमीच्या लेव्हलवर ) ए, काहीतरीच काय --

योगिनीः ए, जाऊ दे आता ! या सगळ्यावरून आता आपण काय करायचं ते ठरवा ! त्याचं काहीही असो !

वनिताः ठरवायचं काय त्याच्यात ? मोडून टाकायचं. आपण एवढं प्रामाणिक राह्यचं आणि यांनी अशी लपवालपवी करायची ! आणि हे आपण सहन करत राह्यचं ! आणि एकदा माणूस असा आहे हे कळल्यावर कशाला किंमत द्यायची त्याला ! प्रेम आणि विश्वास म्हणजे प्रेम आणि विश्वासच पाहिजे ! तसं नसेल तर आणखी काय काय असेल किंवा होईल याचा काय भरवसा धरावा !

नयनाः वनिता, मला वाटतं तू रागाच्या भरात बोलतेयस ! शांतपणेसुध्दा तुझं हेच मत आहे का ?

वनिताः जो एकीला दगा देतो तो कितीही जणींना दगा देऊ शकेल ! आणि असलं दुटप्पी वागणारा माणूस सलग, शांत, प्रेमळ असेलच कसा ? असल्या दगाबाज, ढोंगी, निर्दयी, स्वार्थी माणसाबरोबर कशाला आयुष्य काढायचं ?

रवींद्रः ठीक आहे. मोडून टाकू मग. काय ठरेल ते करू, पण तू शांतपणानं बोल.

नयनाः तू कशाला इतकं चिडतेयस -- विचार तर चाललाय.( ती कशामुळे चिडतेय ते तिला कळलेलं आहे.) अशा गोष्टी आपण इतक्या मनावर घेत राहिलो तर जगणं मुश्किल होईल.

वनिताः मला भयंकर चीड येते असल्या माणसांची -- तिटकारा येतो - यांचं वाईट करायची माझ्यात शक्ती असती तर जास्तीत जास्त वाईट केलं असतं मी यांचं -- कमकुवत आणि भेकड माणसं -- असल्या माणसाबरोबर साळूसूदपणे जगायचं ढोंग करता येईल तुला योगिनी ?

नयनाः वनिता, हा नुसता तुझ्या मताचा प्रश्न नाहीय -- तू योगिनीचा काही विचार करणार आहेस की नाही ?

रवींद्रः आणि कुणाचंच अजून तसं काही म्हणणं नाहीय.

नयनाः योगिनीचंही म्हणणं ऐकू -- योगिनी, तुला काय वाटतं ?

योगिनीः वनितानं या सगळ्याला फारच भडक स्वरूप दिलय. त्यामुळं बोलणं अवघड झालंय, पण मला माझं म्हणणं सांगायचं आहेच. कारण हे सगळं शेवटी माझ्या आयुष्याशी संबंधित आहे.

नयनाः तसं काही तू लक्षात घेऊ नकोस. तुझं जे म्हणणं असेल ते मोकळेपणाने बोल.

योगिनीः सगळ्यांचे गुणदोष हे असणारच. काही कळतील, काही कळणार नाहीत. काही सांगितले जातील, काही सांगितले जाणार नाहीत. आणि नवीन पुन्हा वरसंशोधन करूनही दोषरहित स्थळ मिळेल अशी खात्री नाही. दिनेश इंजिनियर आहे. नोकरी चांगली आहे. घरची माणसं चांगली आहेत. थोडंफार खरंखोटं असेल. लग्न म्हणजे थोडाफार धोका आलाच. मी तो समजून, उमजून पत्करायला तयार आहे. त्या दुसऱ्या मुलीशी त्याचं जे काही बिनसलं असेल त्याला मी जबाबदार नाही. त्याचा काही व्रण -- परिणाम त्याच्यावर राहिला तर तो घालवायला मी त्याला मदत करीन. नाही जमलं तर सहन करीन. माझा विचार असा आहे की, जे ठरलंय त्याच्यात काहीही बदल करायची गरज नाही. ठरल्याप्रमाणे हे लग्न करावं असं माझं मत आहे. आणि प्रेमबीम काहीही असलं तरी कोडासारखी गोष्ट-- ते खरं असेल तर -- न सांगणं चूकच होतं तिचं --

वनिताः मग तुमचं तुम्ही बघा . मी कर्तव्य म्हणून जे वागायचं तेवढं वागत राहीन. मी सांगून ढोंग करीन. फक्त योगिनीचं लग्न होईपर्यंत. नंतर पुढं कायम हे ढोंग चालू ठेवायची जबाबदारी मी घेणार नाही.

नयनाः अग पण, इतकं काय हे,चुकलंच सगळं ! --

रवींद्र : काय चुकलं ?

वनिताः चुकलं - बिकलं काही नाही. माझा निर्णय पक्का आहे. तुमचं बोलून झालं की जेवायला या ! ( ताड ताड आत जाते.)

योगिनीः माझाही निर्णय पक्का आहे ! आधी नव्हता, पण सगळ्या विचारांती आता झालाय.

रवींद्रः ठीक आहे मग. पण हे तुझं तू ठरवलंयस हे लक्षात घे.

योगिनीः तुझ्यावर कधीही दोष येणार नाही.

नयनाः मग काय, प्रश्नच मिटला ! ( आत जाते.)

रवींद्रः वनिता इतकी चिडून का बोलली पण ?

योगिनीः मीही तिला असं कधी बघितलं नव्हतं । --

( अंधार होतो. द्रुत सनई. पुन्हा प्रकाश पडतो तेव्हा योगिनीचे लग्न होऊन पंधरा दिवस होऊन गेलेले आहेत. दार बंद आहे -- पण जेव्हा उघडले जाईल तेव्हा सोनेरी नारळाचे तोरण अजून आहे ते दिसावे. समोर योगिनी आणि वनिता. त्यांच्यात आधी काही बोलणे होऊन गेले आहे. वनिता डोळे पुसते आहे. योगिनी पाहते आहे. काही क्षणांनी-- )

वनिताः ( तीव्र मनःस्थिती) आपल्यातल्या नातेसंबंधाव्यतिरिक्तही आपल्यात एक आपुलकी आहे. तसं नसतं तर काही निर्णय घेण्यापूर्वी मी हे सगळं तुला सांगायला हवं असं मला वाटलं नसतं. तुला मी फक्त एक रवींद्रच्या बाजूची व्यक्ती असं समजत नाही. आणि म्हणूनच मला एक प्रश्न पडतो की या विषयावर तू माझ्याशी कधीच काहीच कसं बोलली नाहीस ? त्याच्या आणि नयनाच्या प्रकरणाबद्दल

तुला काहीच माहिती नसेल हे मला पटत नाहीय.

योगिनीः ( शांतपणे ) रवींद्रचं असं काही आहे इतपत मला सांगोवांगीची माहिती होती. पण नयनाला मी पाहिलं नव्हतं. तो याबद्दल मला कधीच काहीच बोलला नव्हता. अद्याप बोललेला नाही. मीही स्वतःहून कधी विषय काढला नाही. त्याला जर मला हे सांगायचं नसेल तर मुद्दामहून मी हा विषय काढावा असं मला कधी वाटलं नाही. तुझं न् त्याचं लग्न सांगून -- बघून -- ठरवून झालं. नंतर अधांतरी मला कळलेला तो विषय मागं पडला. तेच पुन्हा कधीतरी खोदून विचारावं असं मला वाटलं नाही. आणि नंतर ते मूर्खपणाचंही झालं असतं. आणि त्याच्या खाजगी आयुष्यातल्या कोणत्या गोष्टी कितपत उघड करायच्या हा त्याचा प्रश्न आहे असं मी समजले.

वनिताः तुझं लग्न होईपर्यंत काही बोलायचं नाही असं मी ठरवलं होतं. मनातलं मनात दाबून ठेवलं होतं. बाहेर कुणाला काही दिसू दिलं नाही. ( योगिनी पाहतेय ) . तसं तर दादाच्या ऑपरेशनच्या वेळी पैशांची चर्चा झाली तेव्हाच मला राग आला होता. पण तुझ्या लग्नाचं तितकंच महत्त्वाचं कारण होतं. म्हणून मी गप्प बसले. विषयाला वळणच तो असं देत गेला, की आपण यावेळी त्यांना मदत करू शकत नाही याचं वाईट वाटण्याचाच फक्त प्रश्न आहे. आहेत ते पैसे घेऊन जा, लग्नाच्या वेळेपर्यंत परत करायला सांग -- असं तो म्हणू शकला असता. ऑपरेशनमध्ये दादा गेलाच तर--अशीही शंका आली असेल त्याला ! स्वार्थी !

योगिनीः ते अजून तुझ्या डोक्यात आहे !

वनिताः हा मात्र स्वतःच्या अडचणी बघणार, फायदे बघणार. त्यांचं संभाषण ऐकल्यानंतरही माझं नयनाशी बरंच बोलणं झालं. आमच्याकडून हुंडाबिंडा मिळतोय म्हटल्यावर नयनाला दिलंन यानं सोडून ! आर्थिक अडचणी होत्या म्हणे ! त्या निवारण्याचा हा मार्ग ! तिचं काय होईल याची फिकीर नाही !

योगिनीः बरं मग आता काय विचार आहे तुझा !

वनिताः तो या विषयावर नयनाशी जे बोलत होता ते एखाद्या निगरगट्ट गुन्हेगारासारखं वाटलं मला.स्वार्थीपणा, दुसऱ्याबद्दलची बेफिकिरी, खोटेपणा आणि क्रूरपणा पुरेपूर भरलाय त्याच्यात ! मला त्याचा तिटकारा

येतो ! आता मी गप्प बसणार नाही. असल्या माणसाबरोबर मी आयुष्य काढू शकणार नाही ! नाही राहू शकणार मी या माणसाबरोबर ! नॉर्मल मनानं कसं वागता येईल मला आता ?

योगिनीः एवढं टोकाला जायची गरज वाटतेय तुला ?

वनिताः नयनाच्या आयुष्याची राख केलीय त्यानं. अजून लग्न केलेलं नाही तिनं. आणि करणारही नाही म्हणते

ती. दुर्दैव म्हणून स्वीकारलंय तिनं हे सगळं आणि माझा स्वभाव लक्षात घेऊन सांग -- हे असं आहे आणि तरीही तो अशा कारणांनी माझ्याशी लग्न करू इच्छितोय हे जर मला लग्नाच्या आधी सांगितलं गेलं असतं तर केलं असतं मी लग्न याच्याशी ? मुळीच केलं नसतं. म्हणजे माझीही पूर्ण फसवणूक केलीय त्यानं. नयनाचा खुनी आहे तो. मी असला खुनी माणूस नवरा म्हणून कधीच स्वीकारला नसता.( चिडून)

' मी माझा स्टॅंड बदलणार नाही ' म्हणे ! स्टॅंड घेतोय । एक नंबरचा ढोंगी आणि नालायक माणूस वाटतो तो मला ! मी नीट कशी राहणार आता ?

योगिनीः तुझा संताप ठीक आहे. पण मलाही कितपत ऐकता येईल हाही विचार कर. बहीण आहे मी त्याची !

वनिताः माझा संताप सांगायला आणि आता मी काय करणार आहे ते सांगायलाच मी मुद्दाम तुला बोलावलं आहे. तुझं लग्न होऊन पंधरा दिवस होऊन गेल्यावर. ऐकायचं नसेल तर तसं सांग. मग, मी आधी तुझ्याशी का बोलले नाही असं तू म्हणायचा प्रश्न राहणार नाही.

योगिनीः बरं, बोल तू. पण त्याचा भूतकाळ तुझ्या कल्पनांप्रमाणे कसा असणार ?

वनिताः एखाद्या परपुरुषानं फसवून संबंध ठेवण्यासारखं चाललंय हे ! माझ्या नवऱ्याचं एक चित्र माझ्या मनात होतं -- ते चित्र म्हणजे आपणच असं हा दाखवत होता. पण आता खरं चित्र उघडं पडलं आहे. ते माझ्या नवऱ्याचं चित्र नाही. मी ज्याच्याशी लग्न केलं, संसार करायचं ठरवलं तो हा नाही. हा तर नयनाचा खुनी आहे ! मला सतत अपराधी वाटत राहील आणि त्याच्याबद्दल चीड !

योगिनीः	एक लक्षात घे. ते जे काय असेल ते पूर्वी घडून गेलेलं आहे. लग्नानंतर काही त्यानं तुझी फसवणूक केलेली नाही.

वनिताः	पण ज्या फसवणुकीवर आधारित आमचं लग्न झालं ती तशीच चालू ठेवायचीय त्याला --

योगिनीः	हे आता कशासाठी तुला सांगायचं आणि डिस्टर्ब करायचं तुला ?

वनिताः	आता सांगण्याचा प्रश्नच नाहीय -- खोटेपणावर आधारित आमचा संबंध होता. तो खोटेपणा उघडा पडल्यावर संबंध संपणारच --

योगिनीः	हे बघ वनिता, तू कसा विचार करावास हे मी सांगू शकत नाही; पण मला तुझे हे विचार विध्वंसक वाटतात.

वनिता::	( एकदम चिडून ) कशामुळं आले हे विचार ? त्याच्या विध्वंसक वागण्यामुळं ! या विचारांची झळ तुला पोचू नये म्हणून मी थांबले ! आता माझ्या आयुष्यातलं हे विष मला काढून टाकावंच लागेल. नाहीतर मी जगूच शकणार नाही.( हळवी होत ) मी खूप नमून वागणारी एक मवाळ स्वभावाची स्त्री आहे हे तुलाही मान्य होईल. पण हे सहनच होणार नाही मला !

योगिनीः	( काही क्षणांनी ) तुझ्या मवाळ स्वभावामुळंच दुसऱ्यांबद्दलच्या तुझ्या अपेक्षा फार तीव्र आहेत. मी स्वतः तर समजून-उमजून आणि तोसुध्दा अशीच गोष्ट गुप्त ठेवायच्या प्रयत्नात होता हे माहीत असून लग्न केंलेलं आहे. ती दुसरी व्यक्ती असणार आहे याचा अर्थ ती व्यक्ती मी नसणार आहे. फार आदर्शवादी राहणं घातक होईल. आणि समजा, त्याच्या हातून चूक होऊन गेली आहे, पण त्याची जबाबदारी तोच घेतोय. तुझा कुठं संबंध येतो ?

वनिताः	असल्या चुकांच्या जबाबदाऱ्या घेत राहणाऱ्या माणसांचा मला तिरस्कार वाटतो.

योगिनीः	हा तुझा अतिभावनिकपणा होतोय. यातून नुकसान होईल आणि नंतर पस्तावून उपयोग होणार नाही.

वनिताः	नंतरचे विचार करायच्या हिशोबी मनःस्थितीत नाहीय मी.

योगिनीः	बरं मग म्हणणं काय तुझं ?

वनिताः	माझा निर्णय बरोबर की चूक अशी शंकासुध्दा माझ्या मनात नाही. मी घटस्फोट घ्यायचं ठरवलंय.

योगिनीः	काय हे वनिता !

वनिताः	घटस्फोटानं निर्माण होणारं दुःख टाळण्यासाठी आयुष्यभराचं हे फसवणुकीचं दुःख मी घेऊ शकणार नाही -- माझाही स्वभाव तुम्हाला विचित्र वाटला तरी मी काय करणार ?

योगिनीः	हा अतिरेकीपणा होतोय --

वनिताः	जे काय असेल ते असेल ! तू याला अतिरेकीपणा म्हटलंस म्हणून मला माझं मन थोडंच बदलता येणार आहे ! आणि तो तरी कुठं माझ्या दृष्टीनं नॉर्मल आहे ?

योगिनीः	मला असं वाटतं की रागाच्या भरात काही निर्णय घेण्यापेक्षा जमल्यास नंतर शांतपणे तू विचार करावास --

वनिताः	हा विचार आणि शांतपणा कधीच एकत्र असू शकणार नाहीत माझ्या बाबतीत --यातनं सरळ सामोपचारानं कायदेशीर मार्ग काढणंच योग्य होईल --

योगिनीः	तुझी मर्जी मग ! खरं तर काही विशेष संकट नाही असं तुला जगता येईल !

वनिताः	माझं मन तुझ्यासारखं असतं तर ! तसं नाहीय ! मला हेही दुखावल्यासारखं -- अपमानित वाटतं -- माझ्याकडून जे व्हायचं तेच होणार.

योगिनीः	दुसऱ्यांकडूनही त्या त्या परिस्थितीत व्हायचं तेच झालेलं असतं !

वनिताः	आणि तरीही सगळ्यांचं काही ना काही वागणं चालू असतंच ! सगळ्यांचं सगळं बरोबर आहे म्हणून सगळं बंद थोडंच पडतं ? ( योगिनी काही बोलत नाही. काही क्षणांनी ) आणि मी निघून गेल्यानंतर काय घडणार आहे तेही मला माहीत आहे. असा माणूस आपोआप कसा वागेल त्याचा मी अंदाज करू शकते. त्यानं तर माझ्या तिरस्काराचा आणखीनच भडका उडतो.

योगिनीः	असं काय घडेल असं तुला वाटतं ?

( इथे अंधार होतो. पुन्हा प्रकाश पडतो तेव्हा समोर रवींद्र ऐसपैस पडलेला. काही क्षणांनी बेल वाजते. तो उठतो. जाऊन दार उघडतो. नयना येते. तो दार लावतो. पुढे येतो. )

नयनाः	( काही क्षणांनी ) तिनं डोक्यात राख घालून घ्यायला नको होती. माझ्याशी ती बोलली. मी

परोपरीनं समजावण्याचा प्रयत्न केला. पण ती ऐकायलाच तयार नाही. मला स्वतःला तर किती राग यायला हवाय -- असंही म्हणाले मी. तर तिचं म्हणणं -- मला राग येत नसेल, तिला येतो. मला ती हे सांगायला आली होती की माझ्यामुळं हे झालं असं मी वाटून घेऊ नये. माझ्यामुळं नाश झाला अशी माझी भावना होऊ नये अशी तिला तळमळ वाटत होती.

रवींद्रः तिनं आपलं संभाषण चोरून ऐकलं या तिच्या घाणेरड्या कृतीमुळंच हे झालं ! नाही तर हे असं काही झालं नसतं !

नयनाः रवी, पण एक सांगितलंच पाहिजे मी तुला. तिनं सगळं तुला सांगितलं नाही हा तिचा मोठेपणा आहे. आता खरं तर मी काही सांगितलं नाही तरी चालण्यासारखं आहे. पण तसं नको. खरं तर आपलं संभाषण वनितानं दाराआडून ऐकावं असं मीच तिला सांगितलं होतं. तुझ्या डोक्यात तुझा स्वतःचा एक नैतिक प्रश्न असेल आणि त्यामुळं कदाचित तू योगिनीच्या लग्नाच्या बाबतीत योग्य निर्णय घेऊ शकणार नाहीस आणि तरीही तुझंच मत या घरात प्रभावी होण्याची शक्यता आहे हे सगळं लक्षात घेऊन मी तिला हे सांगितलं. वनितानं या बाबतीत योग्य भूमिका घ्यावी म्हणून मी हे केलं. पण आता कळतंय -- हे काहीही न करताही तिनं विरोधच केला असता. तिचं आणि माझं जग वेगवेगळं असल्यामुळं मला तिचा अंदाज आला नाही.

रवींद्रः माझ्याशी बोलताना तिनं तुझा उल्लेख केला नाही.

नयनाः आणि वनितानं विरोध करूनही योगिनीनं तो जुमानला नाहीच. अर्थात योगिनीनं जो निर्णय घेतला तो तुझा रोख पाहून घेतला, की तो तिचा स्वतःचा निर्णय होता, की ती वनिताच्या आक्रस्ताळी वागण्याला आलेली प्रतिक्रिया होती हे कळणं अवघड आहे. पण खरं तर मी काहीच करायची गरज नव्हती. योगिनीच्या बाबतीत सद्‌हेतूनं असं सपोर्टिंग वागायची मला इच्छा झाल्यामुळंच हे घोटाळे झाले ! आणि याचं मला आता वाईट वाटून काही उपयोग नाही -- झालं ते झालं ! पण खरी दोषी मीच आहे.

रवींद्रः काही फरक पडत नाही. मीसुध्दा खूप विनवण्या केल्या तिच्या, खूप समजावण्याचा प्रयत्न केला, पण तिच्या अंगात मस्ती फार आहे. इतकं नम्रपणे बोलूनसुध्दा किंमत नाही तिला ! मग मी म्हणतो, गेली उडत !

नयनाः मला तुझ्याशी हे सगळं खरं बोलणं आवश्यक वाटतं ! मी सूड भावनेनं काही वागले असल्याची शक्यताही तुझ्या मनात येऊ नये असं मला वाटतं. नाही तर मला फार त्रास होईल.

रवींद्रः ते डोक्यातनं काढून टाक. तसं मला कधीच वाटणार नाही. खरं तर तुम्ही दोघीही भावनाशील आणि आदर्शवादी आहात. पण तिचा आदर्शवाद तिला विध्वंसक बनवतो आणि तुझा तुला माझ्यावरच्या प्रेमाशी बांधून ठेवतो.

नयनाः माझ्यातही हे एक व्द्वंव्दच आहे. इकडं तर स्त्रीनं अपमान सहन करू नये -- अन्याय करणाऱ्या पुरुषावर आपण अवलंबून आहोत असं मानू नये -- अशी माझी मतं आहेत. पण प्रत्यक्षात आता मी दुसऱ्या कुणावर प्रेम करू शकत नाही. म्हणजे एक प्रकारे मी तुझ्यावर अवलंबून असल्यासारखंच झालं !

रवींद्रः ( थकून आणि गुंता असह्य होऊन --) छ्या ! हे सगळं कसं दुरुस्त होऊ शकेल काही कळत नाही ! नयना, मी कबूल करतो की, मी फारसं खोलवर असं प्रेम करू शकत नाही. त्यामुळं नेहमी व्यावहारिक प्रश्न माझ्यावर प्रभुत्व गाजवतात.

नयनाः तुझा जो काही स्वभाव आहे तो मला जाणवत होताच. तरीही मला तू आवडत होतास.

रवींद्रः चूक होणारच होती माझ्या हातून - ती झाली ! तुझ्याबाबतीत.

नयनाः त्याचा विचार आता करू नकोस. जे झालं ते झालं. आता जे माझ्यामुळं विस्कटलं गेलंय ते कसं नीट करता येईल हाच विचार केला पाहिजे.

रवींद्रः हे विस्कटावं असा तुझा हेतू नव्हता. तो वनितानं घडवलेला अनपेक्षित परिणाम आहे. तिनं एवढी डोक्यात राख घालायचं काही कारण नव्हतं. पण तिचा जर इतका आदर्शवादी स्वभाव असेल तर या नाही, दुसऱ्या कुठल्यातरी कारणावरून हे घडलंच असतं. आणि माझा भूतकाळ कळल्यावर तिच्यावर असा काहीतरी परिणाम होऊ शकेल हे मला अभावितपणे जाणवतच असणार आहे. म्हणूनच तिच्या बाबतीत मी

मोकळेपणा ठेवू शकलो नसेन. तिच्यामुळंच खरं तर मला खोटं वागायची गरज वाटली असणार आहे.

नयनाः ( काही क्षणानी ) मला वाटतं तिचा राग शांत झाला की ती परत येईल. ज्या मनःस्थितीत एखादा निर्णय घेतला ती मनःस्थिती बदलली की तोच निर्णय चुकीचा वाटतो.

रवींद्रः उडत गेली ! मी तिची समजूत घालायचा खूप प्रयत्न केला. पण तिच्या अंगात जर एवढी मग्रुरी असेल तर मलाही गरज नाही.

नयनाः मला वाटतं असले विचार तू करू नकोस. ती परत आली तर आता तुझा अहंकार दाखवत बसू नकोस. तिला जुळवून घ्यायची संधी दे.

रवींद्रः आश्चर्य आहे. तुला हे कसं काय जमतं ? आमचं विस्कटू नये ही इच्छा तुला कशी काय होते ?

नयनाः मी इथं आले तेव्हाही कोणतीही वाईट इच्छा माझ्या मनात नव्हती. एकदा जी वस्तुस्थिती मान्य केली त्यात बदल करत बसावं असं मला वाटत नाही. वनिताबद्दलही मला आपुलकी वाटते. आपल्यामुळं कुणाच्या आयुष्यात काही उलथापालथ व्हावी हे सहनच होत नाही मला. म्हणूनच मला असं वाटतंय की काही दिवस जाऊ देऊ, त्यानंतर मी जाऊन भेटेन तिला. शक्यतो तिला समजावून परत घेऊन येईन.

रवींद्रः तुझं तू परस्पर काय करावंस हा तुझा प्रश्न आहे- पण माझं मत विचारशील तर आता तिला अजिबात किंमत द्यायची नाही.

नयनाः मघापासून मी तुला सांगतेय की तिच्या अहंकाराला प्रत्युत्तर म्हणून तुझा अहंकार पेटवत राहू नकोस. दोघेही विध्वंसाला तयार झालात तर चांगलं कसं काही होईल ?

रवींद्रः चांगलं होण्यासाठी इतकी अशी भिकारडी मनःस्थिती मी स्वीकारणार नाही.

नयनाः मनात असा प्रश्न येतो की, या सगळ्या जंजाळाव्यतिरिक्त जगायची काही पध्दत असेल का ? ( त्याच्या जवळ येत ) तू ऐक माझं -- ताणून धरू नकोस.

रवींद्रः ( तिच्या डोळ्यांत काही क्षण पाहात राहतो. ) ती संध्याकाळ आठवतेय मला -- ज्या संध्याकाळी आपण बेभानपणे जवळ आलो होतो -- ती संध्याकाळ कायमची कोरली गेलीय माझ्या मनात -- आत्ता तुझ्याकडे बघताना ती संध्याकाळ जागी होतेय ...

नयनाः रवी, नको, नको... असं नको...

रवींद्रः ( तिच्या दोन्ही खांद्यांवर हात ठेवून ) नयना, मी ... खरंच ( एकदम तिला मिठीत घेतो...तीही पूर्णपणे आसुसून त्याच्या आधीन होते. अस्फुट हुंदके देते. ) नाही, नाही, नयना, ए नयना, हे बघ, हे बघ, मी काय म्हणतोय ते ऐक. मी.. मी तुझाच आहे... नयना... मी तुझाच आहे...तुझाच...

नयनाः ( भावनावशतेनं ) मीही तुझीच आहे... फक्त तुझीच ! ...

( दोघेही असे उभे असताना अंधार होतो. पुन्हा प्रकाश पडतो तेव्हा मूळ दृश्य. योगिनी आणि वनिता. वनिता संतप्त.)

वनिताः का ? का असं वागावं त्यानं ?

योगिनीः तू सोडून द्यायचं ठरवलंयस ना हे सगळं -- मग त्यानंतरच्या त्याच्या वागण्याबद्दलही तू संतापत राहणार का ? मग तर घटस्फोट घेऊनही संपायचं नाही हे कधी -- म्हणजे त्याच्या हातून असं काही घडलंच नाही असं सत्यच अवतरायला पाहिजे. मग तो हा नसेलच. तरच आणि तोच एक मार्ग दिसतो मला.

वनिताः का अशी नासाडी केली त्यानं माझ्या आयुष्याची ?

योगिनीः तू घटस्फोट घेतल्यावर त्याच्यात आणि नयनात जवळीक तयार होईल अशी तुला भीती वाटते आणि या बाबतीत त्यानं तुझ्या अपेक्षेप्रमाणे वागावं असं तुला वाटतं ! इकडं तर तो नयनाचा खुनी आहे असं तुझं म्हणणं आहे, पण त्यानं असं तिला जिवंत करणं तुला मान्य नाही !

वनिताः ( ओरडून ) -- हो -- नाही मान्य ! हा सगळा नाश त्याच्यामुळं होतोय याचं वाईट वाटतच उरलेलं आयुष्य जगला पाहिजे तो --

योगिनीः घटस्फोट घेऊन त्याच्या आयुष्यावर हुकमत चालवायची आहे तुला ! अजब आहे ! हे जमायची थोडी तरी आशा वाटते तुला ?

वनिताः असं होणार नसेल तर त्याच्या हलकटपणाला मर्यादाच नाही असं होईल --

योगिनीः पुढं ?

वनिताः (रडत --) तुलासुध्दा मला हेटाळायचंय -- कोंडी करायचीय माझी -- तुम्ही सगळे एक आहात -- माझं हे असं झालेलं कळल्यावर बाबा कोसळून जातील माझे -- ( हुंदके देत राहते. )

योगिनीः मी आता तुझ्याशी प्रेमानं आणि आपल्यातल्या जवळिकीला स्मरून बोलतेय -- ऐक -- मला वाटतं आता तुझ्यापुढे दोन पर्याय आहेत -- एक तर स्वतःची कीव करत, पराभव पत्करून उरलेलं आयुष्य दबून घालवणं किंवा तुला सुचणारा अतिरेकीपणा अंमलात आणून त्यातून झालेल्या विध्वंसाच्या दुःखात पिचत राहणं -- तुझ्या स्वभावाप्रमाणे थोड्याफार फरकानं यातलाच कुठला तरी एक मार्ग तुला अवलंबावा लागणार आहे -- तुझ्या जगण्याला आता तिसरी शक्यता नाही --

वनिताः ( शरणागतीनं --) एक मैत्रिण म्हणून विचारते -- मी काय करू ? काय करू मी ?

योगिनीः सांगते नं, तेही सांगते. पहिल्यांदा पराभव स्वीकारायचा मार्ग हाताळून बघ, नाही तर दुसरा अतिरेकीपणाचा आहेच ! आधीच अतिरेकीपणा केलास तर मग पराभवाचा मार्ग गमावून बसशील. पराभवाचं अंगवळणी पडलं तर जमून जाईल. अतिरेकीपणा करावा लागणार नाही. एकूण तुझा स्वभाव लक्षात घेता याच्याहून काही सांगण्यासारखं नाही. आणि तुला दोन्ही मार्ग सारखेच महत्त्वाचे वाटत असतील तर एक कर. नाणेफेक कर आणि ठरव. आणि माझी स्वतःची इच्छा काय आहे म्हणशील तर या सगळ्याचा शेवट असा व्हावा की -- त्यानंतर त्यांनी सुखानं संसार केला -- असं म्हणता यावं, ते सगळ्यात बरं.

वनिताः खरं तर ...खरं तर ...

योगिनीः रवींद्र आणि नयना एकत्र येऊ नयेत ही इच्छा घट्ट धरून काय ते वाग -- ( बेल वाजते.) बहुतेक रवींद्रच आला आहे. यापुढचा भाग आता तुझा तू निभावून ने -- मी आत जाऊन पडणार आहे -- आणि आता विनंती करतेय -- ( पुन्हा बेल वाजते. क्षणभर पाहून जाते. दार उघडते. रवींद्र आत येऊन दार लावतो. योगिनी आत जाते. रवींद्र पुढे येतो. वनिता हुंदके देत आहे.)

रवींद्रः काय झालं ? ए, वनिता, अं, काय झालं ? ए, हे बघ, वनिता ...योगिनी आत का गेली ? ए योगिनी SS

( वनिता डोळे पुसते. सावरते. )

वनिताः ( निर्धारानं ) तिला बोलवायची काही गरज नाही --

रवींद्रः नाही, पण तू ...

वनिताः मला सगळं कळलंय -- कधीच !--

रवींद्रः काय ? काय कळलंय ?

वनिताः तेच -- जे तू सतत लपवत आलायस -- तेच --

रवींद्रः म्हणजे ?

वनिताः तुझं आणि नयनाचं प्रकरण. तुमचं संभाषण मी दाराआडून ऐकलं होतं !

रवींद्रः ( क्षणभर अवाक् -- नंतर )-- तू असं ऐकलं असशील तर वाईट केलं आहेस -- पण जाऊ दे. होऊन गेलेल्या गोष्टी आहेत त्या --

वनिताः तू फसवलंस मला --

रवींद्रः एवढं काही महत्त्वाचं नव्हतं ते -- मला काय माहीत की तुला हे इतकं--

वनिताः गंभीर वाटेल !

रवींद्रः आणि खरं म्हणजे नयनाचं इतकं प्रेम आहे माझ्यावर आणि ती मनानं इतकी बांधली गेलीय माझ्याशी हे लक्षातच आलं नव्हतं माझ्या. मी स्वतः इतका गुंतलो नव्हतो.

वनिताः परिणाम काय झाला ? नयना बिन-लग्नाची राहिलीय !

रवींद्रः सांगितलं न वनिता, मी तुला की --

वनिताः आणि लग्नापूर्वी मला जर हे माहीत असतं तर मी लग्न केलं नसतं तुझ्याशी.

रवींद्रः हो, पण इतकं असं सीरियस काही वाटलंच नाही मला -- म्हणजे तुला ते इतकं खटकलं असतं ते आता कळतंय --

वनिताः जे सीरियस असतील त्यांनी तुझ्या वागण्याची फळं भोगायची !

रवींद्रः ( सरळ ) मला काही हे सांगायची खरंच गरज वाटली नाही.

वनिताः हे न सांगण्यासारखं आहे हे निश्चितपणे तुला माहीत होतं -- म्हणूनच नयनाला तू ओळतच नाहीस असं दाखवत राहिलास... मग आता माझा नवरा कुठला ? बुरखे पांघरलेला ? उघडा पडलेला ? की वेळ येईल तसं रूप बदलणारा ?

रवींद्रः तू हेटाळणी करतेयस माझी --

वनिताः नयनाचं आयुष्य बघून काय वाटतं ?

रवींद्रः वाईट वाटतं. वनिता, पण प्लीज, उगीच वाढवू नकोस. आहे हे असं आहे... आता काय करावं असं तुझं म्हणणं आहे ? शब्दानं शब्द वाढवून काही होणार नाही. आता काय केलं पाहिजे ? कारण माझ्या वागण्याचं फार वेळ समर्थन करत बसायची माझी इच्छा नाही किंवा समर्थन होऊच शकत नाही हेही मला मान्य आहे. आणि थोडक्यात म्हणजे तू समजत होतीस तसा मी नसून वेगळाच आहे हे आता तुझ्या लक्षात आलंय -- हेच तुझं म्हणणं आहे नं ? ओके -- आहे तसं --पुढं बोल -- म्हणणं काय आहे आता तुझं ? माझ्या हातून अभावितपणे चूक घडून गेलीय, पण त्याचं किती रण माजवणार !

वनिताः ( क्षणभरानं ) मी घटस्फोट घ्यायचं ठरवलंय -- ( रवींद्र जरा चकित होतो. पाहात राहतो. इथे ती मनानं कोसळते. रडत --) घटस्फोट घ्यायचं ठरवलंय मी ... ( रडत राहते ....)

रवींद्रः ( काही क्षणांनी ) वनिता, हा सगळा तुझ्या मनाचा गोंधळ आहे. चूक होऊन गेलीय हे मान्य -- पण आता ते इतकं टोकाला न्यायची -- इतका नाश करायची खरं तर आवश्यकता नाही.( काही क्षणांनी ) रागाच्या भरात काही ठरवू नकोस. नंतर शांतपणे विचार करून ठरव. आणि घेतला जरी घटस्फोट तरी ती चूक दुरुस्त होणार आहे का ? ... नंतर शांतपणानं ...

वनिताः या विषयावर शांतपणा कधीच येणार नाही मला ... योगिनीचं लग्न होईपर्यंत थांबायचं होतं मला ... तिला याची झळ लागू दिलेली नाही मी ... मीही ढोंगीपणानं वागले एवढे दिवस...( रडत )...ते कसं वाटलं ?...( हमसत राहते. )

रवींद्रः मला काहीच म्हणायचं नाही त्याबद्दल... पण अजूनही काळजी घ्यायचीय मला तुझी ... तू चूक करतेयस ...

वनिताः काहीही केलं तरी दुःखच आहे-- अशा ठिकाणी आणून ठेवलंयस तू माझं आयुष्य...

रवींद्रः हीच चूक तुला आणखी वीस-पंचवीस वर्षांनंतर कळली असती तर काय केलं असतंस ?

वनिताः मी किती सरळ वागत होते तुझ्याशी ... किती नमून वागत होते...तुझ्या इच्छेप्रमाणं चालत होते...फसले मी ...( खाली बसते. )

रवींद्रः ( तिला स्पर्श करून ) वनिता, माझं तुझ्यावर प्रेम आहे हे तरी खरं आहे ना ?...( तोही बसतो. ) तुझा राग मला समजलाय...समजलाय वनिता...माझं प्रेम आहे वनिता...तुझ्यावर ...अं...

वनिताः ...का वागलास पण तू असं ? ( हातवारे करत उभी राहते. तोही हळूहळू उभा राहतो.) का ? ( ती हमसत राहते. तो तिला जवळ घेतो...थोपटत राहतो...)

रवींद्रः आपलं प्रेम आहे नं एकमेकांवर ? प्रेम आहे नं ...( तो तसाच थोपटत राहतो. तिचा टोकदारपणा यात विरून जातो.)

वनिताः ( भावनोद्रेकानं --) आणि आतां... मी जगू नाही शकत ...तुझ्याशिवाय...जगू नाही शकत...( ती त्याच्या खांद्यावर मान टाकून हमसते आहे आणि तो हळूहळू थोपटतो आहे ...पडदा पडत जातो....)

**<u>समाप्त</u>**



पत्ताः- चं.प्र.देशपांडे,
३, स्नेहदीप अपा., चिंतामणीनगर,
वीर सावरकर पथ, सहकारनगर नं.२, पर्वती,
पुणे - ४११००९.
**दूरध्वनी :- २४२२ ७८४७. / २४२२७८४८. / ९३७१००५७७३.**